# ज्ञानेश्वरी

## अध्याय सोळावा.

मूळ, पाठभेद, प्रस्तावना, टीपा, स्पष्टीकरण, शब्दकोश व भाषाशास्त्रविषयक परिशिष्टासह



—: संपादक :—

**दत्तात्रय सीताराम पंगु,**

मराठीचे प्रोफेसर, राजाराम कॉलेज, कोल्हापूर.



: सोल एजंट्स :

**भारत बुकस्टॉल, कोल्हापूर.**

# प्रो. दत्तात्रय सीताराम पंगु यांचे ग्रन्थ

संपादित

( १ ) वच्छहरण
( २ ) सीतास्वयंवर ( नागेशकृत )
( ३ ) ज्ञानेश्वरी अध्याय १२ वा ( द्वितीयावृत्ति )
( ४ ) कुशलवोपाख्यान
( ५ ) वनपर्व ( मुक्तेश्वरकृत )
( ६ ) ज्ञानेश्वरी अध्याय १६ वा. ( द्वितीयावृत्ति )

प्रबंध

( १ ) सामराज ( द्वितीयावृत्ति )
( २ ) आस्वाद ( टीकालेखांचा संग्रह )
( ३ ) तुषार ( टीकालेखांचा संग्रह )
( ४ ) प्राचीन मराठी कविपंचक.

# श्रीमद्भगवद्गीतेचे प्राचीन भाष्यकार

श्रीमद्भगवद्गीता हा भारतीयांच्या अध्यात्मिक व व्यावहारिक ध्येयांचें व तदुपायांचें मार्गदर्शन करणारा एकमेव ग्रंथ होय, अशी ख्याति फार प्राचीन कालापासून चालत आल्याचें दिसून आल्यावरून, वैदिक धर्माचीं गूढ तत्त्वें प्रतिपादणाऱ्या निरनिराळ्या उपनिषदांशीं व त्यांच्यांतील आपाततः असणारा विरोध काढून टाकणाऱ्या 'ब्रह्मसूत्रां'शीं तिची एकवाक्यता दर्शविण्याचें कार्य कांहीं आचार्यांना आपल्या भाष्यग्रंथांच्या द्वारां करणें भाग पडलें. श्रीमच्छंकराचार्य हे अशा भाष्यकारांत श्रेष्ठ व प्राचीनतम असून, त्यांनीं वरील तिन्ही ग्रंथांचें अथवा प्रस्थानत्रयीचें तत्त्वज्ञानाच्या व आचरणाच्या दृष्टीनें, अद्वैतपर व संन्यासपर अर्थ लावले आहेत. दृश्य जगत् हें खरें नसून या सर्वांत एकच शुद्ध परब्रह्म भरलेलें आहे, आणि त्याच्या मायेनें मनुष्याला नानात्वाचा भास होतो. मनुष्याचा आत्मा मूळचा परब्रह्मस्वरूपीच असून, आत्मा व परमात्मा यांच्या ऐक्याचें पूर्णज्ञान असल्याशिवाय मोक्षाची शक्यता नाहीं, इत्यादि त्यांच्या तत्वांनाच "अद्वैतवाद" असें नांव प्राप्त झालें असून, तोच आज अनेक मतांच्या आंदोलनांतूनही दृढमूल झाल्याचें दिसून येत आहे. पण शंकराचार्यांच्या या तत्त्वांना जितकी मान्यता मिळाली तितकाच किंबहुना अधिक विरोध त्यांच्या आचारतत्त्वांना झाला. चित्त शुद्ध होऊन ब्रह्मात्मैक्यज्ञान प्राप्त करून घेण्याची पात्रता येण्यास नित्य नैमित्तिक कर्मांची जरूरी असली, तरी हीं कर्में सोडून देऊन शेवटीं संन्यास घेतल्याखेरीज मोक्षप्राप्ति नाहीं, व सर्व वासना व कर्में सुटल्याखेरीज ब्रह्मज्ञानाची परिणति होत नाहीं, हा जो त्यांचा निवृत्तिमार्गी अथवा ज्ञाननिष्ठ असा दुसरा सिद्धांत, तो मात्र आचरणाच्या दृष्टीनें कठीण व अव्यवहार्य वाटल्यावरून श्रीमद्भगवद्गीतेचें त्यांनीं ठरविलेलें ज्ञानोत्तर संन्यास हें प्रतिपाद्य, बहुजनसमाजाला स्वीकरणीय वाटण्यासारखें नव्हतें.

याचा परिणाम असा झाला कीं, मायावाद, अद्वैत व संन्यास प्रतिपादणाऱ्या शांकरसांप्रदायानंतर सुमारें २५० वर्षांनीं, श्रीरामानुजाचार्य यांनीं आपला विशिष्टाद्वैतसांप्रदाय, श्रीशंकराचार्यांप्रमाणेंच प्रस्थानत्रयीवर भाष्यें लिहून तितक्याच अभिनिवेशानें प्रवृत्त केला. श्रीशंकराचार्यांचा माया-मिथ्यात्ववाद, व अद्वैतसिद्धांत हीं दोन्ही खरीं नसून, जीव, जगत् व ईश्वर हीं तीन तत्त्वें जरी भिन्न असलीं, तरी जीव ( चित् ) व जगत् ( अचित्) ही दोन्हीं तत्त्वें एका ईश्वराचेंच शरीर असल्यामुळें, चिदचिद्विशिष्ठ ईश्वर एकच होय, व ईश्वरशरीरांतील या सूक्ष्म चिदचिदापासून पुढें स्थूल चित् व अचित् किंवा अनेक जीव व जगत् निर्माण होतात, असें या सांप्रदायाचें मत आहे. रामानुजाचार्य हे स्वत: भागवतधर्मी असल्यामुळें, व भागवत-धर्म आचारदृष्ट्या वासुदेवभक्तीलाच प्राधान्य देत असल्यामुळें, तत्त्वज्ञान-दृष्ट्या विशिष्टाद्वैत व आचारदृष्ट्या भक्ति हेंच गीतेचें प्रतिपाद्य असें त्यांनीं ठरविलें. यानंतर १२ व्या शतकांत जन्मास आलेल्या मध्वाचार्यांच्या द्वैती सांप्रदायानें रामानुजांच्या वासुदेवभक्तीला मान्यता दिली असली, तरी परब्रह्म व जीव कांहीं अंशीं एक व कांहीं अंशीं भिन्न मानणें परस्पर विरुद्ध व असंबद्ध होय म्हणून दोन्हीही सदैव भिन्नच मानिले पाहिजेत, त्यांचें ऐक्य कदापि होणें शक्य नाहीं, असें त्यांनीं आपले मत प्रतिपादिलें आहे.

## ज्ञानेश्वरांचें सांप्रदायिक कार्य व तत्त्वज्ञान

यााप्रमाणें व्यक्तीच्या उपासनेचा अथवा भक्तीचा पुरस्कार करण्या-साठीं, वरील दोघां आचार्यांना शांकरमतांतील मायावाद व अद्वैत अमान्य करावें लागलें असलें, तरी भक्तीशी वरील तत्त्वांची त्यांनीं केलेली फारकत, महाराष्ट्रीय संतमंडळानें तरी मुळींच लक्षांत घेतली नाहीं असें दिसून येतें. मध्वाचार्यांच्या समकालीन अशा महानुभावपंथांत द्वैत व भक्तीच्या मिलाफाचा पुरस्कार केलेला असला, तरी त्या पंथाचें कार्यक्षेत्र तत्कालीं मोठ्या प्रमाणांत विस्तार पावलेल्या व अद्वैत भक्तीचा पुरस्कार करणाऱ्या नाथ व वारकरी सांप्रदायांहून किती तरी संकुचित होतें. महाराष्ट्रांत दीर्घकाल रूढ

असणाऱ्या या दोन प्रमुख सांप्रदायांनीं तत्त्वज्ञानाच्या बाबतींत शांकरमताचें पूर्णपणें अनुसरण केलें असून, आचाराच्या दृष्टीनें भक्तीचा त्यांनीं मोठाच गौरव केलेला आहे. ज्ञानेश्वर हे या दोनी सांप्रदायांचे प्रतिनिधि तर होतेच, शिवाय ते स्वतः योगी, ज्ञानी व विठ्ठलभक्त असल्यामुळें, त्यांनीं लिहिलेल्या गीतेच्या 'भावार्थदीपिक' त त्यांनीं अनुसरलेल्या नाथ व वारकरी सांप्रदायांच्या मतांचें प्रतिबिंब पडून, अद्वैत व भक्ति हेंच अनुक्रमें तत्त्वदृष्ट्या गीतेचें प्रतिपाद्य ठरावें यांत नवल नव्हतें. ज्ञानेश्वरासारख्या अधिकारी व वारकरी सांप्रदायांत मान्यता पावलेल्या साधु पुरुषानें, गीताटीकेच्यारूपानें प्रतिपादिलेल्या या तत्त्वज्ञानाची छाप महाराष्ट्रीय संतमंडळावर व त्यानें निर्माण केलेल्या वाङ्मयावर दीर्घकाल पडून, त्याला एक उदात्त सर्वंकष व सर्वसंग्राहक स्वरूप प्राप्त झालें आहे. इसवी सनाच्या सातव्या शतकांत सर्वत्र माजलेली मतमतांतराची बजबजपुरी घालवून अखिल भरतखंडांत आपल्या तत्त्वज्ञानप्रसारानें व मठस्थापनेनें श्रीमच्छंकराचार्यांनीं वैदिक धर्माचें जसें पुनरुज्जीवन केलें, तसेंच बाराव्या शतकांत माजूं पहात असलेलें द्वैताचें साम्राज्य नष्ट करून अखिल महाराष्ट्रांत आपल्या अद्वैत व भक्तीच्या तत्त्वज्ञानप्रसारानें व वारकरीसांप्रदायाच्या पुनुरुत्थापनेनें श्रीज्ञानेश्वरांनींही भागवतधर्माचें अथवा महाराष्ट्रधर्माचें पुनरुज्जीवन करण्याचा मोठाच प्रयत्न केलेला दिसून येतो. ज्ञानेश्वरी ही त्यांच्या या प्रयत्नाचें दृश्य स्वरूप असून, नामदेवापासून निरंजनमाधवापर्यंत तिनें आमच्या संतकवींना कसें मार्गदर्शन केलें आहे, हें संतवाङ्मयाच्या विहंगमनिरीक्षणानें देखील समजण्यासारखें आहे.

तत्त्वज्ञानसिद्धांताच्या दृष्टीनें ज्ञानेश्वर याप्रमाणें शंकराचार्यांशीं बहुतांशीं सहमत आहेत. परमात्मा हा निर्गुण निरुपाधिक व एकमेव असून तो सर्व शून्याचा निष्कर्ष आहे असें ते म्हणतात. वास्तविक जग निर्माणच झालें नसून जें दिसतें तें मायेमुळें, व ही माया दखील अज्ञान्याच्या दृष्टीनें होय असें ते प्रतिपादन करतात. अज्ञानाला त्यांनीं अविद्या, माया, भ्रांति

प्रकृति अशी नांवें दिलीं असून, ज्ञानाच्या उदयानें त्याचा नाश होतो, असें ज्ञानेश्वरींत ठिकठिकाणीं त्यांनीं सांगितलें आहे.[1] जीव व जगत् हाच परमात्मा असून शरीरोपाधीमुळें तो भिन्न भासतो व मायेमुळेंच त्याच्यावर संसारपरंपरा ओढवते असा त्यांचा सिद्धांत असून, आचार्यांप्रमाणेंच अद्वैत-वादाला व मायावादाला त्यांनीं उघडपणें आपली मान्यता दिली आहेत.

तथापि या अज्ञानाचा निरास करून अद्वैत अंगीं बाणण्याची म्हणजे मोक्षाची जीं साधनें अथवा मार्ग प्रसिद्ध आहेत त्यांत मात्र ज्ञानेश्वरांनीं तरतमभाव दाखविल्याचें दिसून येतें. कर्म, भक्ति, योग व ज्ञान हे मोक्षाचे मार्ग त्यांनाही मान्य आहेत. पण त्यांत कर्मयोग ही अगदीं पहिली इयत्ता असा त्यांचा अभिप्राय आहे. ज्यांची चित्तशुद्धि अजून झाली नाहीं, म्हणजेच ब्रह्मज्ञान समजून घेण्याची ज्यांची पात्रता नाहीं, त्या अगदीं प्राथमिक दर्जाच्या उमेदवारासाठीं कर्मयोग असून, समत्वबुद्धियोग हा त्याहून त्यांनीं श्रेष्ठ ठरविला आहे. ज्ञानयोगाच्या तुलनेनेंही कर्मयोग कमी प्रतीचा असें ज्ञानेश्वरांचें मत असून, यांपैकीं कोणता योग स्वीकारावयाचा हें साधकाच्या अधिकारावर त्यांनीं सोंपविलें आहे. ज्ञानयोग हा तात्काल मोक्षदाता असून ज्ञान्यानें स्वत: करतां नसलीं, तरी लोकसंग्रहार्थ कर्में करावीं असें त्यांनीं आचार्यांहून अगदीं भिन्न असें आपलें स्पष्ट व स्वतंत्र मतदान केलें आहे. आचार्यांच्या संन्यासाचा तर ज्ञानेश्वरांनीं कोठेंच अंतर्भाव केला नसून, काम्यकर्मांच्या संन्यासापुरती व नित्यनैमित्तिक कर्मांच्या फलाच्या त्यागापुरती त्याला मुरड घालून, कर्मफल ईश्वरार्पण केल्यानें ज्ञानप्राप्ति होते, अशी कर्म, भक्ति व ज्ञान यांची त्यांनीं एकवाक्यता करून दाखविली आहे.

ज्ञानेश्वर हे स्वत: उत्तम भक्त असल्यामुळें, भक्तियोगावरील त्यांचीं मतें अत्यंत स्पष्ट व जिव्हाळ्याचीं उतरलीं आहेत. फलाशा न धरतां स्वधर्म-प्राप्त कर्में ईश्वरार्पण करण्यास सांगतांना ज्ञानेश्वरांनीं कर्मयोगाला भक्ति-

---

१ ज्ञाने. १६।१०;११.

योगाचें एक उपांगच मानलेलें असून, भक्तियोग ही कर्मयोगाच्या पुढची पायरी आहे, अशी त्यांची समजूत दिसते. तथापि सर्व कर्मांचा संन्यास करून भक्ति करण्यास सांगणाऱ्या इतर सांप्रदायांहून निष्काम कर्में करून तीं ईश्वरार्पण करण्यास सांगणारी ज्ञानेश्वरांची शिकवण, कर्म व भक्ति यांचा समन्वयच घडवून आणणारी असून, तीच त्यांचें खरें वैशिष्ट्य सिद्ध करण्यास पुरेशी आहे. अव्यक्त व व्यक्त अशीं परमेश्वराचीं दोन स्वरूपें असलीं, तरी योगाच्या आचरणानें अव्यक्ताची उपासना करणाऱ्यांना भक्तीपेक्षां लाभ तर अधिक नाहींच उलट कष्ट मात्र फार, असें भगवंतांच्या वाणीनें सांगतांना ज्ञानेश्वरांनीं भक्तीचें सौलभ्यच अधिक विशद केलें आहे.

यापुढें ज्ञानाचें महत्त्व वर्णन करतांना कर्म, भक्ति किंवा योग या कोणत्याही साधनांचा स्वीकार केला, तरी अखेर ज्ञानप्राप्तीशिवाय मोक्ष नाहीं, व या सर्व साधनांची परिसमाप्ति ज्ञानांतच होते, इत्यादि सिद्धांतांनीं ज्ञानेश्वरांनीं ज्ञानाचें अद्वितीयत्वच पुढें मांडले असून, ज्ञान हें मोक्षाचें अंतरंगसाधन आहे, ज्ञानानें पुरुषोत्तम भेटतो व भक्तीचीही परमावधि तेथेंच होते, अशीं[1] गीतेप्रमाणेंच ज्ञान व भक्ति यांची सांगड घालून दाखविली आहे. शिवाय साधनज्ञान व सिद्धज्ञान या ज्ञानाच्या दोन प्रकाराप्रमाणेंच भक्तीचेही दोन प्रकार ज्ञानेश्वरानीं मानले असून, ज्ञानोत्तर भक्तीचा आपला आत्मप्रत्यय विशद करतांना भक्ताच्या अद्वैतज्ञानावर त्यांनीं अखेर अधिक जोर दिला आहे. ज्ञानीभक्त हा सगुणांतच निर्गुण पाहत असला, तरी इतर भक्तिसांप्रदायिक ग्रंथांप्रमाणें ज्ञानेश्वरानीं ज्ञानाला साधन करून भक्तीला साध्य म्हटलेलें नाहीं. ज्ञान व भक्ति यांत त्यांनीं तरतमभाव असा स्पष्टपणें लावला नसला, तरी ज्ञानाला मोक्षाचें अंतरंगसाधन म्हणण्यांत ज्ञानाला त्यांनीं दिलेलें आद्यस्थान मात्र दृष्टिआड करतां येत नाहीं.

---

१ ज्ञाने.–११।४५–५१.

पण भक्तीप्रमाणेंच ज्ञानाचें दुसरें साधन जो योग अथवा हटयोग त्याचें साग्र व पद्धतशीर वर्णन ज्ञानेश्वरींत येणें अपरिहार्यच होतें. ज्ञानेश्वर हे स्वतः नाथपंथीय असल्यामुळें, त्या पंथाच्या तत्त्वानुसार त्यांना हटयोगाचें पूर्ण व अनुभवजन्य ज्ञान प्राप्त झालें होतें. त्यामुळें गीतेचा अर्थ करतांना जेथे वास्तविक ‘ योग ’ याचा अर्थ ‘ हटयोग ’ होण्यासारखा नव्हता, तेथे देखील तसा अर्थ लावून ज्ञानेश्वरांनीं हटयोगाचा आपला व्यासंग व प्रेम व्यक्त केलें आहे. हटयोगाला याप्रमाणें त्यांनीं ‘ पंथराज ’ असें म्हटलें असलें, तरी साधकाच्या दृष्टीनें त्याचा खडतरपणा त्यांना अवगत होता. म्हणून मोक्षाच्या वरील चारी मार्गांपैकीं कोणत्याही एकाचाच विशेष अभिनिवेश त्यांनीं धरला नसून, जो मार्ग ज्याला झेंपेल त्यापासून त्यानें सुरवात करावी, असाच या बाबतींत त्यांनीं निर्णय दिला आहे. वर्णाश्रमधर्मानुरूप फलाशा विरहित कर्मे करणें, तीं करीत असतांनाच ईश्वरोपासना करणें, पुढें सर्व विषयांचा त्याग करून हटयोगानें परब्रह्माचें ध्यान करणें, व शेवटीं परब्रह्मैक्याचें ज्ञान प्रात होऊन परब्रह्मांतच मिळून जाणें इत्यादि कर्म, भक्ति, संन्यास, योग, व ज्ञान संज्ञक या ज्या मोक्षाच्या सहा पायऱ्या आहेत त्यांतून सर्वसाधारण साधकानें गेलेंच पाहिजे. तसाच कोणी अधिकारसंपन्न साधक असल्यास त्यानें यांपैकीं कोणत्याही पायरीपासून प्रारंभ करावा असें सुचवितांना, वरील सहाही पायऱ्या अथवा मार्ग प्रत्येकीं स्वतंत्रपणें मोक्षाप्रत नेणारे नसून, एकानंतर दुसरा, दुसऱ्यानंतर तिसरा अशा मार्गांच्या ईयत्ताच लावण्याचा ज्ञानेश्वरांचा आशय स्पष्ट दिसतो. तथापि त्यांतही संन्यास व योग या ज्ञानसाधनाच्या मार्गांपेक्षां कर्म व भक्ति या मार्गांनींही ज्ञानाची प्राप्ति अधिक सुलभतेनें होते असें प्रतिपादतांना, या मार्गांच्या परस्पर श्रेष्ठकनिष्ठतेपेक्षां साधकाच्या अधिकाराचें तारतम्यच त्यांना विवक्षित असावें असें वाटतें.

## प्रस्तुत सोळाव्या अध्यायाचें प्रयोजन

श्रीमद्भगवद्गीतेंत याप्रमाणें मोक्षप्राप्तीच्या साधनांचें व विशेषतः ज्ञानाचें जसें विस्तृत विवरण आलें आहे, तसेंच तें ज्ञान टिकविण्यास

उपयोगी पडणाऱ्या सदाचाराचेंही ठिकठिकाणीं विवेचन करण्यांत आलें आहे. तसें पहावयास गेलें, तर गीतेंतील विषयानुक्रमाच्या दृष्टीनें ज्ञानाचें विवरण गीतेच्या पंधराव्या अध्यायांतच पूर्ण झाल्यानंतर सोळाव्या अध्यायांत येणाऱ्या दैवासुरसंपत्तीचें वर्णन देण्याचें कांहींच कारण नव्हतें. अर्जुनाला तेथें पुरुषोत्तमयोगरूपी ज्ञान सांगून टाकल्यानंतर त्याला पुन: दैवासुरसंपत्तीवर व्याख्यान चारण्याची भगवंतांना जरूरी नव्हती, अशी शंका गीतेच्या सर्वसाधारण वाचकांस येऊन, पुढें सोळाव्या अध्यायांतील विषय त्याला असंबद्ध वाटण्याचाही संभव आहे. म्हणूनच श्रीशंकराचार्यांचा अनुवाद करून ज्ञानेश्वरानींही आपल्या ग्रंथाच्या या सोळाव्या अध्यायाच्या प्रस्तावनेंत अशा शंकेला उत्तर देऊन टाकलें आहे. त्यांचें एकंदरीनें म्हणणें असें कीं, अर्जुनाला जरी दैवासुरसंपत्तीसारख्या विषयाची जरूरी नसली, तरी इतर जिज्ञासूंपैकीं ज्यांना या ज्ञानाबद्दल अजून खरी प्रीति उत्पन्न झाली नसेल, व ज्यांना हें ज्ञान कसें मिळवावें अथवा मिळाल्यास तें कसें टिकवावें हा विचार पडला असेल, त्यांच्यासाठींच हें सदाचाराचें कथन करणें अवश्य होतें. शिवाय जेणेंकरून ज्ञान उत्पन्न होत नाहीं, झालेंच तर तें आड-मार्गाला लागतें, अथवा तें ज्ञान वाईट कीं चांगलें हें समजावें, म्हणूनही अशा विवेचनाची अपेक्षा असते. ज्ञानाला विरुद्ध असणाऱ्या गोष्टीं समजून घेऊन त्यांना घालविण्याचा विचार करणें, व सर्वप्रकारें ज्ञानाला जें जें हितकारक व पोषक होईल तें तें करणें, हें जिज्ञासूचें कर्तव्य आहे, व या-साठींच अशा जिज्ञासूंनीं ज्ञानाबद्दल मनांत धरलेली आस्था पुरविण्याकरितां भगवंतांनीं सोळाव्या अध्यायांतील विषयाची चतुर योजना केली आहे. ज्ञानेश्वरांनीं याप्रमाणें प्रस्तुत अध्यायाची संगति लावून दाखविली असली, तरी गीतेच्या मार्मिक वाचकाला दैवासुरसंपत्तींचा हाच विषय पूर्वीं एक दोनदा येऊन गेल्यांचें स्मरण होऊन, भगवंतावर पुनरुक्तीचा आरोप करण्यासही तो कदाचित् प्रवृत्त होईल. म्हणून ज्ञानेश्वरांनीं येथे अशी स्पष्टता केली आहे कीं, दैवासुरसंपत्तीचा विषय मागें नवव्या-

अध्यायांतच[१] पुरता करावयाचा. पण तेथें त्या विषयाला सुरवात होते न होते तोंच भक्ति व ज्ञानयज्ञाचें निरूपण पुढें आल्यामुळें, दैवासुरसंपत्तीचा हा विषय अर्धाच राहून गेला. असा मागें राहिलेलाच विषय येथें पुढें चालू केल्यामुळें, प्रस्तुत सोळावा अध्याय हा त्रुटित किंवा विसंगत न होतां नवव्या अध्यायाला पूरकच झाला आहे.[२] पुनः दैवीसंपत्तीच्या कांहीं गुणांचें वर्णन तेराव्या अध्यायांत[३] आलें असलें, तरी कांहीं विषयांची पुनरुक्ति करण्याची गीतेची एकंदरींत पद्धति पाहिली असतां, सोळाव्या अध्यायाला विषयाच्या क्रमाच्या दृष्टीनें वेगळा मानण्याचें कांहीं कारण नाहीं असा ज्ञानेश्वरांचा प्रस्ताव आहे, व म्हणून ज्ञानाला पोषक व मारक अशा गोष्टींच हें विवेचन मग त्यांच्या मताप्रमाणें एकसूत्रीच आहे असें धरून चालण्यास कांहीं हरकत नाहीं.

## सोळाव्या अध्यायाचें प्रतिपाद्य

प्रस्तुत सोळाव्या अध्यायांत केलेलें दैवासुरसंपत्तींचें वर्णन मुख्यतः मोक्षाला साधनीभूत असणाऱ्या ज्ञानाला म्हणजे परमार्थालाच उपयोगी असलें, तरी या दोन्ही संपत्तींचा लोकसंग्रहाच्या किंवा नित्याच्या व्यवहारिक दृष्टीनेही विचार करण्यासारखा आहे. दैवीसंपत्तीचे येथें जे एकंदर सव्वीस गुण सांगितले आहेत, त्यापैकीं अहिंसा, सत्य, अक्रोध, अपैशुन्य, दया, अलोलुप्त्व, मार्दव, ऱ्ही, अचापल्य, तेज, क्षमा, धृति, शौच, अद्रोह व नीतिमानिता असे १५ गुण आजकालच्या व्यवहाराला अगर नीतिशास्त्राला संमत असेच असून, एवंगुणविशिष्ट माणूस आज सुसंस्कृतच काय पण महात्मा समजला जातो. ज्ञानेश्वरांनीं यांपैकीं ' ऱ्ही ' व ' अचापलम् ' या पदांचे अर्थ अंशतः वैराग्यपर लावले असले, तरी बाकीच्या गुणांचें दृष्टांतरूपानें त्यांनीं केलेलें विवेचन सद्यःकालीन जगांत वावरणाऱ्या मानवप्राण्यांना मार्गदर्शक होण्यासारखें आहे. याच्या उलट दंभ, दर्प, अभिमान, क्रोध, पारुष्य, व अज्ञान हे आसुरीसंपत्तीचे सहा दोषही निषिद्ध

---

१ गीता–९।१२,१३. २ ज्ञाने–१६।६३. ३ गीता–१३।७–११.

म्हणून लक्षांत ठेवण्यासारखे असून, अशा सर्व दोषांनीं अथवा यांतील एखाद्यासुद्धां दोषानें युक्त असणारा मनुष्य व्यवहारांत टाकाऊ ठरून कसा अयशस्वी होतो, हें नव्यानें सांगण्याचें कारण नाहीं. श्रीमद्भगवद्गीतेंत आसुरी लोकांचें विस्तृत वर्णन आलें असून, ज्ञानेश्वरांनीं केलेल्या त्यावरील स्पष्टीकरणावरून परमार्थप्रमाणेंच व्यवहाराकडेही त्यांची दृष्टि असावी असें अनुमान काढतां येण्यासारखें आहे. आपण दिलेलें भांडवल परत येईल कीं नाहीं हें न पाहतांच तें चोराजवळ गुंतविणारा कार्याकार्यशून्य मूर्ख; विधिनिषेध, वडिलांची आज्ञा, व आचारविचार न पाहतांच निरर्गल वागणारा सत्याचा दावेदार; ईश्वर व वेद यांचें अस्तित्व अमान्य करणारा पाखंडी नास्तिक; चोरीचें धन कोणाला विष झालें आहे, किंवा जारकर्मानें कोणाला कोड भरले आहे, असा युक्तिवाद करून मनःपूत वागणारा अहंमन्य; जगाचा धिःकार करून आपल्या कृत्यांचा सर्वत्र पुकारा करणारा जाहिरातबाज, मदिरा व मदिराक्षींच्या चिंतनांत काळ घालविणारा रंगेल; दुसऱ्यांना खोड्यांत अडकविण्याकरितां हजार क्लृप्त्या लढविणारा भानगडीबहाद्दर; दुसऱ्याचें बळकावून स्वतःला मोठा धन्य समजणारा हांवभरू; इत्यादींच्या त्यांनीं केलेल्या उल्लेखांवरून ज्ञानेश्वरांचें समाजावलोकन किती सूक्ष्म व मार्मिक होतें, हें चांगलें प्रत्ययास येतें. आसुरी वृत्तींचे लोक प्राचीन काय किंवा अर्वाचीन काय सर्वच कालांत सारखे असून, अशा नराधमांना नरकांतच पडावें लागतें, अशी त्यांच्या कर्मांची फलश्रुति देण्यांत आली आहे. ज्ञानेश्वरांची नरकाची कल्पना निवळ पौराणिक असली, तरी काम, क्रोध, व लोभ यांनाच गीतेंत नरकाचें त्रिविध द्वार म्हटलें असून, भगवंतांनीं यांचाच मुख्यत्त्वानें त्याग करण्यास अर्जुनास सांगितलें आहे. शेवटीं "कार्याकार्यांची व्यवस्था लावतांना शास्त्रालाच प्रमाण मान, व शास्त्र समजून घेऊन विधानोक्त कर्म कर." असा उपदेश या अध्यायाच्या शेवटीं करतांना, भगवंतांनीं अर्जुनापासून ज्ञानोत्तर कर्माचीच अपेक्षा केलेली आहे. ज्ञानेश्वरांना गीतेचें हेंच प्रतिपाद्य

मान्य असून, त्यांनींही आपल्या टीकेंत ज्ञानोत्तर लोकसंग्रहार्थ [१] कर्में करण्याची वरील कल्पना उचलून धरली आहे.

## ज्ञानेश्वरीचें काव्यांग व शैली

वर उल्लेखिलेल्या दैवासुरसंपत्तीच्या वर्णनांत ज्ञानेश्वरांचें सूक्ष्मदर्शित्व व मार्मिकपणा जसा दिसून येतो, तसाच या अध्यायाच्या प्रारंभींच्या प्रस्तावनेंत गुरूकृपादृष्टीवर सूर्योदयाच्या केलेल्या रूपकावरून त्यांची असीम गुरुभक्ति, व अध्यायाच्या शेवटीं श्रोत्यांच्या कृपादृष्टी-बद्दल केलेल्या विनवणीवरून त्यांच्या अंगचा विनय दिसून येऊन, ज्ञानेश्वरांच्या अद्वितीय व्यक्तित्वावर थोडाबहुत तरी प्रकाश पडतो. खरोखर ज्ञानेश्वर जितके तत्त्वज्ञ, योगी अथवा भक्त होते तितकेच ते उच्च दर्जाचे कवि होते, हें ज्ञानेश्वरीसारख्या त्यांच्या टीकाग्रंथा-वरूनही उघड होतें. प्रस्तुत सोळाव्या अध्यायांत प्रमुख असा रस जरी सांगतां आला नाहीं, तरी दैवासुरसंपत्तींच्या अनुक्रमें गुणदोषविवरणांत त्यांनीं जी आपातत: अलंकारांची योजना केली आहे, तिच्यावरून त्यांची सर्वश्रेष्ठ कल्पकता निदर्शनास आल्यावांचून राहत नाहीं. ज्ञानेश्वर ज्या ज्या वेळीं गुरुकृपादृष्टीचें वर्णन करतात त्या त्या वेळीं ते तिच्यावर निर-निराळीं रूपकें योजतात. बाराव्या अध्यायांत अगदीं प्रारंभीं गुरुकृपादृष्टीवर त्यांनीं मातेचा आरोप केला आहे, तर येथें सोळाव्या अध्यायांत त्यांनीं गुरूवर ज्ञानसूर्याचें सुंदर व उदात्त रूपक [२] कल्पिलें आहे. पण ज्ञानेश्वरींत ‘ देह अहंतेचे अविसाळे, ’ ‘ ज्ञानाज्ञानाचिया चांदणिया, ’ ‘ आत्मज्ञानाचे डोळे, ’ अशीं समासरहित परंपरित रूपकें, तशीच ‘ लिंगदेह कमळांचा, ’ ‘ चिद्गगनभवनदिवा, ’ ‘ उन्मेखसूर्यकांत-स्फुलिंगें ’ इत्यादि समासघटित परंपरित रूपकें आढळलीं, तरी उपमादृष्टांताच्या मानानें त्यांची संख्या पुष्कळच कमी भरेल. विषयाचें

---

१ ज्ञाने.–१६।४६६

२ ज्ञाने.–१६।१–१६.

स्पष्टीकरण बहुजनसमाजाला पटविण्यास उपमांचा अतिशय अपयोग होतो, हा व्यवहारांतील नित्याचा अनुभव लक्षांत घेऊनच ज्ञानेश्वरांनीं उपमांचा उपयोग आपल्या ग्रंथांत अधिक केला आहे. दैवीसंपत्तीच्या गुणांपैकीं ' सत्वशुद्धि ' व ' ज्ञानयोगव्यवस्थिति ' या पदांचे अर्थ देतांना त्यांनीं अनुक्रमें पतिव्रेतची व कुलीन घराण्यांत दिलेल्या मुलीची जी उपमा दिली आहे, ती जितकी स्पष्ट तितकीच हृद्य आहे. ज्ञानेश्वरांचे उपमानभूत विषय गंगा, चंद्र, वृक्ष, जल असे नहमींच काव्यमय व उदात्त असतात; व याच विषयांची पुनरावृत्ति झाल्यानें वरून जरी त्यांत अभिनवता दिसली नाहीं, तरी प्रत्येक वेळीं त्यांच्यांतील नवीन साधारणधर्मानें ते विषय रसिकाला तरी नाविन्याचाच आस्वाद घडवितात. तथापि उपमा देतांना उपमानाचा आकार, लिंग, सजीवता, निर्जीवता इत्यादि सूक्ष्म गोष्टींकडे न पाहतां, ज्ञानेश्वर फक्त साधर्म्याकडेच अधिक लक्ष देतात. ज्ञानेश्वरींत उपमांनंतर दृष्टांतांचाच अनुक्रम लागेल. पण त्यांतही उपमांसाठीं ज्ञानेश्वर जसे निसर्गांतील काव्यमय वस्तु, अथवा शुक-रंभा, गंगा-सागर, समुद्र-टिटवी अशा पौराणिक आख्यायिका, व चंद्र-चकोर, हंसक्षीर, निधान-अंजन, कूर्म-दृष्टि असे कविसंकेत सहजी योजतात, तशा दृष्टांतासाठीं व्यवहारांतील सर्वपरिचित वस्तूंच ते निवडून घेतात. ज्ञानेश्वरांना भाषाशास्त्र व साहित्यशास्त्र पूर्ण अवगत असलें, तरी त्यांच्या ग्रंथांत सर्वत्र चमकणारे अलंकार निव्वळ त्या शास्त्राचा आपला परिचय दाखविण्याकरितां त्यांनीं योजले नसून, विषयविवेचनाच्या ओघांतच ते स्फुरण पावलेले आहेत. त्यामुळें जेथे ज्ञानेश्वरांना एकादीच गोष्ट गौरवून सांगून तिचें महत्त्व श्रोत्याच्या मनावर ठसवावयाचें असतें, तथ त्यांच्याकडून इतर अलंकारांचीही योजना अगदीं स्वाभाविकपणें होते. उदाहरणार्थ सव्वीस गुणांच्या दैवीसंपत्तीवर त्यांनी अनुक्रमें गंगा, मुक्तिबाला व शुक्तिकळे यांच्या ज्या रुपकोत्प्रेक्षा [१]

---

१ ज्ञाने.-१६|२०७-२१०

केल्या आहेत, त्या जितक्या रमणीय व काव्यमय आहेत तितक्याच त्या दैवीसंपत्तीला श्रोत्यांपुढ अथवा वाचकांपुढें मूर्तिमत उभी करण्यास समर्थ आहेत. त्याचप्रमाणे 'मार्दव' या गुणाच्या स्पष्टीकरणांत संताची व कापुराची 'मार्दव' या साधारणधर्माच्या बाबतींत तुलना करून, उपमेय जो संत, त्याचें उपमानभूत कापूराहून आधिक्य दाखवितांना, 'व्यतिरेका' ची[1] जी योजना त्यांच्याकडून झाली आहे, ती तर मूळ वर्ण्यविषयाचें महत्त्व वाढविण्यास चांगलीच कारणीभूत झाली आहे. ज्ञानेश्वरांचे उपमानभूत विषय नेहमीं विशाल व व्यापक तर असतातच, पण सुष्ट वस्तूंच्या वर्णनांत सुष्ट, व दुष्ट वस्तूंच्या वर्णनांत दुष्ट उपमेयोपमानांची सांगड घालतांना वाचकांचीं मनें आपल्या विवक्षित विषयांसंबधीं अनुकूल करून घेण्याची त्यांची हातोटी मात्र ठिकठिकाणीं चांगलीच स्पष्ट झाली आहे.[2]

वरील अर्थालंकाराप्रमाणें शब्दालंकारहीं ज्ञानेश्वरांनीं कांहीं मुद्दाम आणलेले नाहींत. त्यांच्या रचनेंत " आतां जैसे कां मौवाळ । जलचरांसि जळ । कां पक्षियांसीं अंतराळ । मोकळें हे ॥ १६८ ॥ तया चक्रवांकाचें मिथुन । सामरस्याचें समाधान । भोगवी जो चिद्गगनभवनदिवा ॥ ६ " असा यमकानुप्रासांचा थाटमाट जागजागीं उडाला असून, त्यांच्या रचनेंत ओंवीच्या पहिल्या तीन चरणांच्या शेवटीं असणाऱ्या एकाक्षरी यमकांप्रमाणेंच " जो अविद्ये राती रुसोनियां । गिळी ज्ञानअज्ञानाचिया चांदणियां । जो सुदीनु करीं ज्ञानियां । स्वबोधाचा ॥ २ ॥ " अशीं दोन अक्षरी यमकेंही क्वचित् कांहीं ओंव्यांतून आढळतात. तथापि ज्ञानेश्वरांची खरी प्रवृत्तीच नादमधुर अशा अक्षररचनेकडे असून, वाचकांच्या चित्ताला द्रवविणारीं व वर्ण्य विषयाला अनुकूल अशीं मृदु व सानुस्वार अक्षरें त्यांच्या लेखणींतून कशी विनाश्रम उतरतात. " आता तीव्र होउनि मवाळ । जैसे जातीचें मुकुल

---

१ ज्ञाने–१६।१७१–१७२.

२ ज्ञाने-१६।२५२.

कां तेज परि शीतल । शशांकाचें ॥ ११५ ॥ कां वसंताचिया वाहाणी । आलेया वनश्रियेच्या अक्षौणी । न करीतु घेणीं । निगाला तो ॥ १६४ ॥ अशा कित्येक ओंव्यांत ज्ञानेश्वरीच्या माधुर्याची व प्रसन्नतेची गोडी चाखतां येईल. याच माधुर्याला पोषक म्हणून अर्थु, सुखावतु, प्राणु, दिनकरु, या शब्दांतील अंतीचा उकार; तर जाये, जेयाचे, होये, देहे, यांतील एकार; तसाच ठावो, निश्चयो, यांतील ओकार; तर म्हणौनि, मानौनि यांतील औकार; व सरिसें, वरिषा, कवतिकिणी, अशा शब्दांतील वर्णागम करण्याची तत्कालीन भाषापद्धति, त्यांना स्वाभाविकच मोठी उपकारक झाली असून यांच्या भाषेला त्यामुळें मोठी गौल्यता प्राप्त झाली आहे. कर्णकठोर शब्द वगळून ज्ञानेश्वर जेव्हां मृदुव्यंजनयुक्त शब्दच तेवढे निवडून घेतात, त्यावेळीं त्यांच्या शब्दप्रभुत्वाबरोबरच त्यांच्या महान् रसिकतेची साक्ष पटते. एरव्ही रश्मि-पुंज, अंबर, दिवसनाथ, तुरंबणी, केशिहंता, पूर्णचंद्रिका, राजीव, अशा संस्कृत व सानुस्वार शब्दांऐवजीं दुसरे त्याच अर्थाचे शब्द त्यांना सांपडले नसते असें नाहीं. तथापि माधुर्याप्रमाणेंच प्रसाद हा ज्ञानेश्वरीचा एक विशेष असून त्या एकाच गुणामुळें, ती ‘ गीतार्णव ’ किंवा ‘ यथार्थदीपिका , यांसारख्या इतर प्राकृत गीताटीकांहून लोकप्रिय होऊन शिरोधार्य ठरली आहे. ज्ञानेश्वरीची भाषा प्राचीनत्वामुळें आज जरी दुर्बोध वाटली, तरी ती एका काळची जनबोली होती, हें विसरतां कामा नये. संस्कृत भाषेंत असणारी श्रीमद्भगवद्गीता, अज्ञ प्राकृत जनतेला सुगम व्हावी म्हणून तर ज्ञाने-श्वरांनीं तत्कालीन प्रचारांतल्या शब्दांचाच काय, पण संप्रदाय व म्हणींचाही बुध्द्या भरपूर उपयोग आपल्या ग्रंथांत केला आहे. पण म्हणून ओज या तिसऱ्या काव्यगुणाकडे त्यांचें दुर्लक्ष झालें असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं. जेथे जेथे त्यांना आसुरसंपत्तींतील दुर्गुणासारख्या दुष्ट वस्तूंचें अनिष्टत्व हडसून खडसून श्रोत्यांच्या मनावर बिंबवावयाचें होतें, तेथे तेथे त्याला उठाव देणारी कठोरव्यंजनात्मक रचना त्यांनीं केली आहे. “ ना ना विषवर्गु एकवटु । तेया नांव जैसा बासटु । आसुरसंपत्ति हा खोटु । दोखांचा

तैसा ॥ २१५ ॥ कां मांदुरी लोकांचा घोडा। गजपती हि मानी थोडा। कां कांटिये वरिला सरडा। व्योम नीच ॥ २२४ ॥" यांतील टकार डकाराच्या आविर्भावानें दंभदर्पासारख्या दुर्गुणांची दुर्दमनीयता कोणाला पटणार नाहीं?

यावरून विषयाशीं तादात्म्य हेंच ज्ञानेश्वरांच्या लेखनशैलीचें खरें रहस्य म्हणतां येईल. ज्ञानेश्वरांचे चेतोहर शब्दसौष्ठव, त्यांनीं योजलेले अचूक व बुद्धिगम्य उपमा—दृष्टांत, भव्योदात्त रूपकें व एकच विषय निरनिराळ्या स्वरूपांत मांडणाऱ्या पल्लेदार उत्प्रेक्षा, वाचकांच्या मनाला भुरळ पाडून, त्यांच्या भोंवतीं एक अद्भुतरम्य वातावरण उभारतात. तसेंच ज्ञानेश्वरांच्या ज्ञानेश्वरी ग्रंथांत त्यांच्या अद्वितीय व्यक्तित्वाचा, सुकोमल अंतःकरणाचा, काव्यमय व रसिक वृत्तीचा पुरता ठसा उमटला असल्यामुळें, ज्ञानेश्वरी म्हणजेच ज्ञानेश्वर असें समीकरणही वाचकाला पटतें; आणि मग ही गीताटीका रचण्यासाठींच केवळ त्यांचा अवतार होता, असें घटकाभर त्याच्या भाबड्या मनाला वाटल्यास, त्यांत तरी वावगें असें काय आहे?

## ज्ञानेश्वरीचा ओंवी छंद

याप्रमाणें ज्ञानेश्वरीच्या काव्यांगासंबंधीं या अध्यायाच्या अनुरोधानें थोडें फार सांगतां आलें, तरी तिच्या मनोरमत्वास व प्रसन्नतेस तिचा ओंवीछंद कांहीं कमी कारणीभूत झालेला नाहीं! 'ओंवी ज्ञानेशाची' असें रामचंद्र बडव्यासारख्या रसिकानें जें एकदा म्हणून ठेवलें, तें तिच्या साडेतीन चरणांच्या सुटसुटीत सोज्वळ स्वरूपामुळेंच असलें, तरी एवढें खरें कीं, मूळ ज्ञानेश्वरीच्या ओवींचा शेवटचा चरण साधारणत: ४ पासून ६ अक्षरांहून मोठा नसतो. बाकीच्या प्रत्यकीं पहिल्या तीन चरणांत, विषयपरत्वें अक्षरांची संख्या कमी अधिक करून वैचित्र्य व वाङ्मयीन परिणाम साधण्याचा प्रयत्न केलेला दिसतो. विषय, स्तुतिस्तवनासारखा गंभीर असेल तेथें बहुधा चरणांतील अक्षरसंख्या ६, ८, ९ पासून १०, १२, १४ पर्यंत वाढत गेलेली आढळते. विषय सामान्य विवरणाचा, दृष्टांत देऊन सांगावयाचा असल्यास प्रत्येक चरणांतील अक्षरसंख्या ६ पासून ८ पर्यंतच्या

मर्यादेंत असते. एकच एक ओंवीवृत्त कंटाळवाणें होईल, म्हणून अक्षरसंख्येच्या या न्यूनाधिक्यानें व मध्यंतरीं ऱ्हस्वदीर्घांच्या पालटत्या क्रमानें ज्ञानेश्वरांनीं थोडेफार वैविध्य व नादमाधुर्य साधलें आहे. या ऱ्हस्वदीर्घ अक्षरांच्या क्रमावरून ठाम व बांधीव असा सिद्धांत जरी बांधतां आला नाहीं, तरी ' यति ' मात्र ओंवीच्या प्रत्येक चरणाच्या शेवटीं दिलेला असतो. ज्ञानेश्वरीच्या ओंव्यांत प्रत्येक ठिकाणीं असें वैचित्र्य दाखवितां येणार नाहीं हें खरें आहे. पण तिच्या कित्येक ओंव्या, अभंग, भूपाळी, व अंजनीगीतासारख्या चालीवर म्हणतां येतात हें अनुभवसिद्ध आहे. प्रस्तुत सोळाव्या अध्यायांतील " यज्ञमूढ मुसिले यागी । देवपिसे प्रतिमेलागी । नागविले भगवे योगी । समाधिभ्रमें ॥ " ही एकच ओंवी घेतली, तर ती कवि सोपानदेव चौधरी यांच्या ' गोकुळीचा कान्हा माझा । पाहिला किं काय गे ॥ ' या गीताच्या चालीवर म्हणतां येते असें दिसून येईल. यावरून अक्षरांच्या निरनिराळ्या आघातप्रत्याघातांवर ज्ञानेश्वरीच्या कांहीं ओंव्या वाचल्या असतां, त्यांच्यांत भिन्न भिन्न छंदाची व चालींची प्रतीति येते हें समजून येण्यासारखें आहे.

## ज्ञानेश्वरीची भाषा

वर केलेल्या या विवेचनाबरोबरच ज्ञानेश्वरीच्या भाषेचा व तत्कालीन समाजाचा कांहींसा विचार करणें अस्थानीं होणार नाहीं असें वाटतें. ज्ञानेश्वरी हा ग्रंथ यादवकालीन असल्यामुळें, मराठी भाषेच्या बहुविध ढंगांनीं परिपूर्ण व इतक्या परिणत स्वरूपांत तो निष्पन्न होण्यास तत्पूर्वीचें बरेंच वाङ्मय कारणीभूत झालें असलें पाहिजे, हें आज उपलब्ध असलेले शिलालेख, ' रत्नमाले ' सारखीं ज्योतिष व वैद्यकीय प्रकरणें, आणि महानुभावी वाङ्मय, यांवरून सिद्ध होतें. ज्ञानेश्वरीची प्रमाणभूत प्रत आज आपल्यापुढें नसली, तरी तत्कालीन भाषेच्या व्याकरणांतील वर्णविचार, शब्दविचार व वाक्यरचना यांसंबंधीं कयास बांधून तशी एक विश्वसनीय

मानतां येण्यासारखी ज्ञानेश्वरीची प्रत, महानुभावी वाङ्मयाच्या तौलनिक अभ्यासानें तयार करणें आपणास शक्य आहे.

ज्ञानेश्वरीच्या भाषेंत ' कवतिकिणी ' ( कौतुकिणी ), ' स्परिसें ' ( स्पर्शें ), ' सगरवा ' ( सगर्वा ) असा **वर्णागम**; ' आघवे ' ( आवघे ) असा **वर्णविपर्यय**; ' संडावी ' ( सांडावी ), ' मनावें ' ( मानावें ), ' आगि ' ( अग्नि ) असा **वर्णनाश**; ' मवणी ' ( मापणी ), ' गोठि ' ( गोष्टि ), ' दिठी ' ( दृष्टि ) ' तातला ' ( तापला ), अशी **वर्णविकृति** झालेली आढळते. ' साच ' ( सत्य ), ' वानिलासी ' ( वर्णिलासी ), अशा शब्दांत जोडाक्षरांतील एक अक्षर गळून उपांत्य स्वर दीर्घ झालेला असतो. ' पाहाट' ( प्रभात ), काहणी ( कथानक ), ' महूर ' ( मधुर ) अशा शब्दांत अनुक्रमें **भ थ** व **ध** बद्दल ह घालण्याचा प्रघात दिसतो. ' कीजे ' ( क्रियते ) ' दीजे ' ( दीयते ), ' काज ' ( कार्य ) अशा शब्दांत **य** बद्दल **ज** येतो, तर ' तीख ' ( तीक्ष्ण ), ' निखळु ' ( निष्फळ ), ' पाखाण ' ( पाषाण ) अशा शब्दांत **क्ष** व **ष** बद्दल **ख** झालेला आढळतो. ज्ञानेश्वर व महानुभाव यांच्या भाषेंतील लक्षांत राहण्यासारखा विशेष असा कीं, तिच्यांतील ' फोकरिजे' ' सवर्घ ' ( सवर्ग ), ' सांघितले ' ( सांगितले), ' निफजे ' ( निपजें ), ' तन्ही ' ( तरी ) अशा शब्दांतील मूळ अक्षरांत हकार मिसळलेला असतो. त्याचप्रमाणें आजच्या कांहीं शब्दांच्या पुढें, ज्ञानेश्वरकालीं एक दोन अंत्याक्षरें जोडलीं जात.[1] आजचा द्वितीयेचा ' ला ' हा प्रत्यय, ' लाग ' या धातूच्या पूर्वकाळवाचकाच्या शब्दयोगी अव्ययासारख्या उपयोगानें बनविलेला दिसतो.

**नामांचे** अनेक प्रकार ज्ञानेश्वरींत पाहिले म्हणजे, आपले जुने प्राकृत संस्कृतोत्पन्न व कानडी, गुजराथी, हिंदीसारख्या शेजारच्या भाषांतून आलेले

---

१ उदा०–व्हावयाला – होआवेयालागि ( ज्ञाने. ), प्रतिमेला— प्रतिमेलागि ( ज्ञाने. ), अभिचाराला—अभिचारालागौनिया ( ज्ञाने. )

कितीतरीं शब्द, आजच्या मराठी भाषेच्या प्रचारांतून नाहींसे झाले आहेत याची कांहींशी कल्पना येते. अविसाळें, आसकडी ( कोंकणी ); दांगे, ( वऱ्हाडी ); निब्रु (कानडी), उखर, निद, पैलकडु (कुडाळी), सुरवाडु, हाथैवा, कांटाळें, वोलावा, उजरा, वास (मलबारी), कऱ्हेया, उधवी, उभडु, किडाळ, चाथी, अडदरु, सुहाडा, परावा, मवणी, चिंतवणी, रयणी, उगाणा भोकसा, नावाणिगी, दाटुगी, तुरंब्रणी, सरोभरी, सिरियाणी, कामाकारें, साउमा, सियारी, विभुटणी, नाराणुक, कराळें, माहेवणी, आडवंगी (कानडी), ब्रासटु, पाणियडे, आरोगण ( गुजराथी ), घसासित, सातवेउळी, तागा, मिस ( हिंदी ), पेंदळी, मातु ( कानडी ), अळुमाळ, आसलग, निसाणी, मेर ( कोंकणी ), पेणें ( कोंकणी ), मुदी ( कोंकणी ); अशीं याच अध्यायांत अनेक उदाहरणें सहजीं सांपडतात. फार नाहीं तरी इथें, केतुला, तेतुला, अनारिसें, आन, कवण, केती, सरिस, अशीं **सार्वनामिक विशेषणें** आज थोडीं अपरिचितच भासतात. साध्या **विशेषणांत**ही चोख, वोखटें, मैळ, मवाळ, साचार, फुडें, उजळु, चांगी, खोटु, अशा आज जुन्या वाटणाऱ्यांचाच भरणा फार. काडिती ( काढणारी ), वाढविती ( वाढविणारी ), बैसणा ( बसणारा ) अशीं वर्तमानकालवाचक विशेषणें संस्कृतच्या घर्तीवर गेलेलीं आढळतात.

**विभक्तिप्रत्ययां**कडे पाहिल्यास, रावो, देवो, पुरुषु, अशीं **प्रथमेची** एकवचनीं; व ज्ञानिये, पापिये, अशीं अनेकवचनीं रूपें दिसतात. मुक्तातें, आपणेयां, ठाया, अशीं **द्वितीयेची**, तर लाजां, श्रोतृशक्ती, सद्वैद्यें, ब्रह्मेंसिं, अशीं **तृतीयेचीं** रूपें रूढ होतीं. ज्ञानासि, वायूसि हीं **चतुर्थीं**ची, व क्लेशौनि पाताळहोनि अशीं **पंचमीची** रूपें तत्कालीन भाषेची कल्पना **करून** देतात. सर्वांचे, परबुद्धीचा, अशी आजच्या सारखी **षष्ठी** व प्रपंचा असें **षष्ठ्यर्थी सामान्यरूपही** कोठे कोठे उमगतें. तातलां तेलीं, पायीं, अशीं **सप्तमीची रूपें** नित्याचींच आहेत. या विभक्तींच्या प्रत्ययाबरोबरच कांहीं ठराविक अव्ययांनीं विभक्तिप्रत्ययांचे काम भागविलें जाई. दोखालागीं, उद्देशासाठीं

ज्ञानविखीं, सुखाचिदोसें, दुःखिताच्याभागीं, मनामाजीं, निकृष्टास्तव (चतुर्थी) तेयाचाठायीं, वाद्येवीण (तृ.) अशीं कित्येक उदाहरणें आज चमत्कारिक वाटण्यासारखीं आहेत.

शब्दयोगी अव्ययांत 'चि' 'ही' यांचा, व उभयान्वयी अव्ययांत 'जे' (कारण), म्हणौनि (म्हणून, या साठीं), वरि (शिवाय आणखी), कीं, (जसा–तसा), कां (अथवा), 'नातरि' (किंवा) इत्यादींचा समावेश झाला असून, पां, गा, अगा! बापा! अशीं केवलप्रयोगी अव्ययेंही या यादवकालीन भाषेंत सांपडतात.

क्रियापदांचा पसारा सुद्धां कांहीं लहान नाहीं. आथि, कीजे, प्रवेशिजे, फूटति, आइकिजति, अशा क्रियापदांबरोबरच, वानूं लाधलों, वाढों लागे, देखों भूलले, बोलों घेई अशीं सहाय्य क्रियापदेंही योजलेलीं दिसतात. नेदखति, नेदितु, नेघपे, नातुडविजे, असे अकरणरूपी एकशब्दात्मक धातु, मुक्तेश्वराच्या कालापर्यंत सुद्धां चालत आलेले आहेत. उगाणिला, परिणामौनि, सुखावतु, संकोचली, कदरसी, अशा नामधातूंनीं थोडक्यांत पुष्कळ अर्थ व्यक्त करण्याची पद्धति स्वीकारलेली आहे. ज्ञानेश्वरींत सहाय्य क्रियापदांचा उपयोग काल, प्रयोग व रूप दर्शिवण्याकडे जसा केला जातो, तसाच तो जोरदारपणा व परिणामकारकता साधण्यासाठीही केलेला आहे. वर दिलेल्या सहाय्य क्रियापदांचा या दृष्टीनें विचार करण्यासारखा आहे.

काळ व अर्थ यांकडे वळल्यास, निरोपितसे, रिगतीं, चोरवेळ फिटे, अशीं वर्तमानकाळचीं रूपें रीतिवर्तमानासारखीं वाटतात. आणिजे, अथवा करिजे, अशा कर्मकर्तरी रूपांपुढेंच 'एल' जोडून 'आणिजैल' 'करिजैल,' अशीं भविष्यकाळचीं रूपें सिद्ध केलीं जात. नेयिजे, दीजे, यांत आज्ञार्थ, तर मानावे, सांडावे यांत विध्यर्थ स्फुट होई. कीजे, काळवंडिजे, दीजे, अशीं कर्मणीरूपें तर ज्ञानेश्वरींत असंख्य असून, कृदतांत सुखावतु, पोसीत, उघडितु, हीं वर्तमानकालवाचकें; फेडिली, दाविला,

हीं भूतकालवाचकें, व क्लेशौनि, माजौनि, अशीं पूर्वकालवाचकें पुष्कळच सांपडतात.

आतां ज्ञानेश्वरींतील कांहीं सामासिक शब्द पाहिल्यावर ते धेडगुजरी आहेत असें कित्येकांना वाटेल. गांवरस, चोरवेळ, अर्धधणी, वाडजतन, वाटवाहाणी, धर्मदिवी, धर्मधेनु, परमारु, सुखपहाट, हे समास संस्कृत धर्तीवर असले, तरी त्यांत एक संस्कृत व एक प्राकृत अशा दोन शब्दांचा संयोग केलेला आहे. निश्चयात्मक अव्ययांत ‘ कीर ’, ‘ हन ’ व क्रियाविशेषणांत पुढतपुढतीं, आळुमाळ, पाठीं, पैस, व सैघ, हीं उल्लेखनीय आहेत.

वाक्प्रचार व सांप्रदाय या संबंधानें एवढें खास म्हणतां येईल कीं, देशांतील चालीरितींत आचारविचारांत व संस्कृतींत जसजसा फरक पडत जातो तसतसे वाक्प्रचारही बदलत जातात. निरनिराळे वाक्प्रचार रूढ होणें, हे निरनिराळ्या संस्कृतींच्या संगमावर अवलंबून आहे. ज्ञानेश्वरांचा काल स्वराज्याचाच काय पण परकीय आक्रमणाचा वारा देखील न लागलेला असा असल्यामुळें, तत्कालीन भाषेचें किंवा वाक्प्रचाराचें स्वरूप निर्भेळ स्वदेशी असल्यास त्यांत नवल नाहीं. ( १ ) पाट बांधणें ( ओ.५० ); (२) वृत्तिका होणें. ( ८४ ); (३) चांगावे करणें ( १९५ ), (४) वास पाहणें ( २८६ ); (५) तेउतें वारेनही नोहावे ( ३८४ ); (६) हाड रोवणें ( ३१४ ); (७) सोय धरणें ( ४३३ ); (८) घाए वाजणें ( ३९८ ); (९) उत्तीर्ण होणें ( ३३ ); (१०) अशुभ पिकणें ( ४२३ ) अशा वाक्प्रचारांत यादवकालीन जीवनाचा ठसा उमटलेला आहे. मात्र ‘ जातें जीवित, ’ यांत भूतभूतकालवाचकाचा नामाप्रमाणें केलेला उपयोग; मेळावा मेळवीति, सळे सळती, घाये घालती अशी सजातीय कर्मयुक्त ( Cognate Objects ) रचना; यंति, सिद्धति, अशा संस्कृत रूपांची योजना; व अधिकारपर्यालोचें, स्वाव्यत्वें, जलवाच्यबोधु, बळीकरण, मृगांभ, विद्याविनोदविभवें, दर्वी, ज्ञानकथनप्रस्तावीं, अपाययंत्रें, अशी निवळ संस्कृत शब्दांची केलेली पखरण;

या गोष्टींवरून मराठीनें वाक्यरचनेच्या बाबतींत अजून संस्कृतचें जोखड झुगारून दिलें नव्हतें, असे दिसून येईल.

## ज्ञानेश्वरकालीन समाज

ज्ञानेश्वरींतील उपरिनिर्दिष्ट भाषासांप्रदायावरून व ठिकठिकाणीं योजलेल्या अनेक उपमादृष्टांतांवरून तत्कालीन राजकीय, सामाजिक व आर्थिक परिस्थितीचें कांहींसें आकलन होतें. यादवांची राजवट शौर्या-बद्दल प्रसिद्ध असल्यामुळें, मांदुरी लोक म्हणजे घोडेस्वार मोठ्या ऐटीनें मिरवीत असल्यास नवल नाहीं ( २२४ ). गुन्हेगारांना लोखंडाच्या बेड्या घालण्याचा आजच्या सारखाच प्रघात असून ( २६५ ) त्यांना खोड्यांत अडकविण्याची शिक्षा देण्यांत येई [ ३१६ ]. न्यायनिवाडा बहुतेक चावडीवर होत असे [ २९४ ]. राजेलोक कीर्तिस्तंभ उभारीत ( ३१९ ) असून, ते लोकांना गांव अग्रहार करीत असत ( २०६ ). राजकीय बाबतींत तत्कालीन लोक जसे राजनिष्ठ होते, तसेच सामाजिक प्रकारांतही ते श्रुतिस्मृतिप्रणीत आचारानें वागणारे होते. यादव-कालांत चातुर्वण्य मानलें जात असून, ब्राह्मणांनीं मत्स्याहार करणें निषिद्ध मानलें जाई ( ४४९ ). कौटुंबिक व्यवहारांत मुलीला सुकुलीन वर मिळाला असतां, मुलीच्या बापास आजच्या प्रमाणेंच हायसें वाटे ( ८३ ). पातिव्रत्याचें महत्व तत्कालीं विशेषच असून, स्त्रियांना तें कल्याणाचें तर वाटत असेच ( ४५४ ), पण आपल्या प्राणपतीसाठीं सती जाऊन मरण कवटाळण्यांत त्यांना कांहींच वाटत नसे ( १८६ ). अशांतही एक पत्नी जिवंत असतांना दुसरी करण्याची पद्धति जशी रूढ होती ( २३४ ), तशा कांहीं वाईट चालीच्या बायका आपल्या जाराच्या नांवावर सौभाग्यवती म्हणून मिरवत ( ३७६ ). याप्रमाणें यादवकालांत देखील चोरी, चहाडी व शिनळकी यांपासून आजच्या प्रमाणेंच कोणतेंही

शहर सुटलेलें नसून, जारणमारण करण्यांत पारंगत असलेले अभिचारकहीं त्याकाळीं होतेच ( ३५८ ).

गृहव्यवस्थेच्या बाबतींत घरांना धुराडी ठेवण्याची आजच्या सारखीच त्याकाळीं देखील चाल असून ( २९३ ), घराच्या उंबरठ्यावर अशुभ निवारणार्थ तीन खिळ ठोकण्याची विचित्र रुढी मात्र अंधश्रद्धेचा नमुना म्हणून सांगतां येईल (४२८). शिवाय पायाळू माणसाच्या डोळयांत एकप्रकारचें अंजन घातलें असतां त्याला भूमिगत द्रव्य दिसतें, अशा समजुतीचा उल्लेख ज्ञानेश्वरींत अनेकदा आला आहे (८८). त्याचप्रमाणें भिंतीवर चित्रं काढून लोक आपली सौंदर्यदृष्टि जशी व्यक्त करीत (१३२), तशीच कांहीं ठिकाणीं धर्मार्थ दिवे लावून आपलीं परोपकार बुद्धीही दाखवित ( ६५ ). प्रत्येक गांवाला आजच्या प्रमाणेंच उकिरडा व पाणोटा हा असेच.

एकंदरीनें यादवकालीन लोक कृषिप्रधान, सश्रद्ध व दैवयोगावर विश्वास ठेवणारे असेच म्हणतां येतील. कुमुहूर्त व कुयोग यांच्या प्रमाणेंच सर्व दुष्ट ग्रह एकाच राशीला आले तर, किंवा धूमकेतूचा उदय झाला असतां जगावर अनिष्ट कोसळतें (३१८), असा त्यांचा फलज्योतिषावर पूर्ण भरवंसा होता. विंचू चावला तर शळी मरते, अथवा राजहंस आपल्या चोंचीनें पाणी व दूध निराळें करतो, अशी जशी त्यांनीं एक समजूत करुन घेतली होती ( २५८ ), तसच मेलेल्या वासराच्या शरीरांत पेंढा भरून व तो गाईपुढें ठेऊन तिची धार काढण्याची युक्तीही त्यांच्या अंगांत होती, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे ( ३८५ ).

भगवद्गीता हा ग्रंथ प्राकृतजनांना सुगम व्हावा यासाठीं जनबोलींतील शब्दांचा, लोक प्रचारांतील म्हणींचा, बहुजनसमाजांतील आचारपद्धतींचा व समजुतींचा, ज्ञानेश्वरांनीं उपमादृष्टांतांच्या रूपानें भरपूर उपयोग करुन घेतल्यामुळें, त्यांचा ग्रंथ म्हणजे तत्कालीन समाजस्थितीचा आरसाच म्हणावयास हरकत नाहीं. आपल्या सभोंवतींच्या समाजाशीं समरसून

सहानुभूतीनें लिहिणारा लेखक स्वकालीन समाजेतिहासाच्या व भाषाशास्त्राच्या दृष्टीनें पुढील पिढ्यांना कसा उपकारक होतो, याचें ज्ञानेश्वरमहाराज हें एक स्पष्ट निदर्शन आहे. ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांत त्यांच्या व्यक्तित्वाचें व समाजस्थितीचें पडलेलें प्रतिबिंब, प्रस्तुत सोळाव्या अध्यायांतही अंशतः दिसून आल्याशिवाय राहत नाहीं. ज्ञानेश्वरीचा अभ्यास यासाठींच सांप्रदायिकदृष्टीप्रमाणें विचिकित्सक दृष्टीनेंही होणें अवश्य आहे.

## प्रस्तुत अध्यायाची संपादणी

प्रस्तुत प्रत तयार करतांना कै. रामचंद्र विष्णु माडगांवकर, कै. इतिहासाचार्य राजवाडे व ब्रह्मीभूत नानामहाराज साखरे यांच्या ज्ञानेश्वरींच्या प्रतींचा उपयोग केला आहे. मूळ ठरवितांना यादवकालीन भाषेचें वैशिष्ट्य, अर्थसौकर्य व सुसंगति यांकडेच प्रामुख्यानें लक्ष पुरविलें असून, या तिन्हीं प्रतींपैकीं स्वीकारलेला पाठ वर देऊन बाकीचे तळटीपांत दिले आहेत. या स्वीकारलेल्या पाठांपैकीं ठळक पाठांचें समर्थन त्या त्या स्थळीं टीपांत केलें आहे.

या तीन प्रतींतील ओवीसंख्या व ओव्याचा क्रम लक्षांत घेतां, कांहीं ओंव्यांचें न्यूनाधिक्य तर कांहींचें नवीनत्व दिसून आलें. शिवाय प्रत्येक श्लोकाखालीं ज्ञानेश्वरीटीका देतानां पुष्कळ सांप्रदायिक प्रतींतून मूळ श्लोकाला, अर्थाच्या व पदस्पष्टीकरणाच्या दृष्टीनें अगदीं विसंगत अशा ओंव्या छापलेल्या आढळल्या. प्रस्तुत प्रतींत अर्थ व संदर्भ पाहून ओंव्यांची ग्राह्याग्राह्यता ठरविली असून, पुनः कोणत्या श्लोकाखालीं कोणत्या ओंव्या येणें इष्ट व युक्त, हेंही राजवाडे, माडगांवकर व साखरे यांच्या प्रतींच्या तुलनेनें ठरविलें आहे. उदाहरणार्थ ओवी २६, ही राजवाडेप्रतींत, माडगांवकर व साखरे यांच्या प्रतींतील ओंवीहून थोडी भिन्न आहे. राजवाडे-प्रतीच्या ओवींत, पूतनेच्या कथेचा उल्लेख आहे, तर माडगांकर-साखरे प्रतींत भृगुकथेचा दृष्टांत आहे. ‘ अपकारा ’च्या संदर्भाच्या दृष्टीनें भृगूची कथाच येथें अधिक विवक्षित असें मला वाटल्यावरून, माडगांवकर–साखरेप्रतींतील

ओंवीच मी स्वीकारलीं. तसेंच ओंवी [illegible] माडगांवकर–साखर प्रतींत आहे, पण राजवाडेप्रतींत नाहीं. संदर्भाकडे पाहिलें तर " दैवी संपत्ति सांघैल " असें वर ज्याप्रमाणें म्हटलें आहे, त्याप्रमाणें ' आसुरीये ही घोरे । कीजैल रूप ' असें कोठे तरी म्हणणें अवश्यच होतें, व तेंच या ओंवींत म्हटलें असल्यामुळें, ही ओंवी अंतर्भूत करणें युक्तच होतें. पुढें पहिल्या श्लोकावरील टीका, माडगांवकरप्रतींत ६८ व्या ओंवीपासून सुरूं होते, तर राजवाडेप्रतींत ती ६२ व्या ओवीपासून सुरूं केली आहे. पहिल्या श्लोकांतील पदांचा क्रम पहातां, माडगांवकरांचाच क्रम मला युक्त वाटला. ओवी १०६ ( राजवाडे ) ही माडगांवकरप्रतींत थोडी निराळी आहे. पण राजवाड्यांची ओंवी अर्थाकडून अधिक व्यापक असल्यामुळें, तीच मुळांत घेतली आहे. ओंवी १५४ (रा. १५३) देखील, राजवाड्याहून अशीच भिन्न आहे. पण त्यांत मूळ श्लोकांतील ' दया ' या पदाचें स्पष्टीकरण येत असल्यामुळें, माडगांवकरप्रतींतील ही ओवीच मला ग्राह्य वाटली. माडगांवकरप्रतींतील तिसऱ्या श्लोकाच्या टीकेंत " आतां ईश्वरालागीं " इत्यादि १९५ वी ओंवी दिली आहे. पण राजवाडेप्रतींत ती दिसून येत नाहीं. विषयाच्या संदर्भानें तिचा क्रम लागत नसल्यामुळें, राजवाड्यांना अनुसरून मीही ती गाळून टाकली आहे. तसेंच ओंव्या २१२–२१५, या राजवाड्यांनीं चवथ्या श्लोकाखालीं दिल्या आहेत, तर माडगांवकर–साखरे, त्या तिसऱ्या श्लोकाखालीं देतात. चवथ्या श्लोकांत आसुरीसंपत्तीचे वर्णन सुरूं होत असल्यामुळें, राजवाड्यांचा क्रमच मी अनुसरला. ओंवी २५८, ही राजवाड्यांनीं २५९ च्या आधीं दिली असून, माडगांवकर–साखरे मात्र या क्रमाचा व्यत्यास करतात. पण दृष्टांतांचा चढता क्रम लक्षांत घेऊन मी राजवाड्यांचा क्रम कायम केला आहे. ओंवी २६३, ही माडगांवकर–साखऱ्यांनीं चवथ्या श्लोकाच्या टीकेच्या अगदीं शेवटीं दिली आहे, तर राजवाडे तिला पांचव्या श्लोकाच्या टीकेंत अगदीं प्रारंभीं घालतात. विषयसंदर्भ व श्लोकांतील पदांच्या अर्थाच्या

दृष्टीनें, माडगांवकर–साखऱ्यांचा क्रम बरोबर असल्यानें तोच मी या प्रतींत ठेविला आहे. ओंवी २७५, हीं राजवाड्यांनीं सातव्या श्लोकाच्या टीकेखालीं ढकलली आहे, उलट माडगांवकर—साखरे यांनीं २७५—२७९ या ओंव्या सहाव्या श्लोकाखालीं दिल्या आहेत. सहाव्या श्लोकाचा अर्थ पाहतां, माडगांवकर—साखऱ्यांचाच क्रम मला सुसंबद्ध वाटल्यावरून तोच मी निश्चित केला. आणखी असें कीं, सातव्या श्लोकावरील टीका, माडगांवकरप्रतींत २९१ व्या ओवीनें पूर्ण झाली आहे, तर साखरेप्रतींत ती २९३ व्या ओवीनें पूर्ण केली आहे. राजवाड्यांनीं २९१ ओंवी आठव्या श्लोकाखालीं दिली आहे. एकंदरींत अर्थाचा संदर्भ व दृष्टांताची ठेवण पाहून साखऱ्यांचाच क्रम मला स्वीकरणीय वाटला. तसेंच ३१३–३१५ या ओंव्या, माडगांवकर–साखरे यांनीं नवव्या श्लोकाखालीं दिल्या आहेत, तर राजवाड्यांनीं त्या आठव्या श्लोकाखालीं छापल्या आहेत. वर दिलेल्या कारणास अनुसरून मी माडगांवकर–साखऱ्यांनाच अनुसरलो आहे.

याप्रमाणेंच ३२२ वी ओंवी, माडगांवकर व साखरे यांनीं दहाव्या श्लोकाखालीं दिली असून, राजवाड्यांनीं ती नवव्या श्लोकाखालीं दिली आहे. पण या ओवींत दहाव्या श्लोकांतील पदांचा अर्थ आला असल्यानें माडगांवकर–साखरे यांचाच क्रम मी बरोबर धरला आहे. याच्या उलट सोळाव्या श्लोकाखालील ३६३ व ३६४ या ओंव्यांचा क्रम, माडगांवकर –साखऱ्यांनीं, प्रथम ३६४ व त्यानंतर ३६३ असा उलटा धरला आहे. राजवाड्यांनीं तो, अगोदर ३६३ व नंतर ३६४ असा दिला आहे. वरील श्लोकांच्या व्याख्यानाचा प्रारंभ एकदम एखाद्या उपमेनें अगर दृष्टांतानें होणार नाहीं हें लक्षांत घेऊन, मी राजवाड्यांचा क्रम बरोबर मानला आहे. ओंव्या ३७५ व ३७६ माडगांवकर–साखऱ्यांनीं सोळाव्या श्लोकाखालीं घातल्या आहेत, पण राजवाड्यांनीं त्या सतराव्या श्लोकाच्या टीकेंत अगदीं

प्रारंभींच दिल्या आहेत. सतराव्या श्लोकांतील पदांचा अर्थ पाहून व सोळाव्या श्लोकावरील व्याख्यान, ३७४ ओंवीनेंच संपल्याचें ध्यानीं घेऊन मी राजवाडेप्रतीचाच क्रम येथें कायम केला आहे.

पुन: या प्रतींतील ४१७ ओंवीनंतर माडगांवकर—साखऱ्यांनीं 'पापा जयाचा कांटाळा। उपजे अमंगळ अमंगळा। विटाळु हि विटाळा। भिये जया ॥ ४१९ ॥ ही ओंवी दिली आहे. पण राजवाड्यांच्या प्रतींत ती आढळत नाहीं. अर्थाच्या दृष्टीनें सदर ओंवी अधिक भर घालीत नसल्यानें, ती प्रक्षिप्त कल्पून राजवाड्यांप्रमाणेंच मी ती गाळून टाकली आहे. पुढें ४२२ ही ओंवी, माडगांवकर—साखऱ्यांनीं विसाव्या श्लोकावरील टीकेच्या अगदी शेवटीं दिली आहे, तर राजवाड्यांनीं तिला एकविसाव्या श्लोकांवरील टीकेच्या प्रारंभीं घातली आहे. पण विसाव्या व एकविसाव्या श्लोकांचे विषय व स्पष्टीकरणाची पदें पाहिल्यास, माडगांवकर—साखरे यांचाच क्रम कोणालाही संमत होण्यासारखा आहे, व म्हणून तोच येथें मान्य केला आहे. शेवटीं ४४७ व ४४८ या ओंव्यांचा राजवाड्यांच्या प्रतींत व्यत्यास केलेला आढळून आला. पण अर्थाच्या चढ उताराच्या मानानें माडगांवकर—साखरे प्रतींचाच क्रम मला ठेवावा लागला.

राजवाडेप्रतींतील १६ व्या अध्यायाची ओंवीसंख्या ४७० आहे. माडगांवकरप्रतींत व साखरेप्रतींत ती ४७३ आहे. प्रस्तुत प्रतींत, ६० वी ओंवी राजवाडे प्रतींहून अधिक असल्यामुळें, व माडगांवकर—साखरे-प्रतींतील १९५ व ४१९ या ओंव्या यातून गाळल्यामुळें, तिची एकंदर ओवीसंख्या ४७१ ही मुक्रर करण्यांत आली आहे.

वरील स्पष्टीकरणावरून ही प्रत तयार करतांना, मूळ गीतेच्या श्लोकांच्या अर्थसंगतीकडे लक्ष देऊन राजवाडे, माडगांवकर व साखरे यांच्या प्रतींच्या तुलनेनें या प्रतींतील ओंव्यांचा क्रम ठरविल्याचें दिसून

येईल. त्यामुळें, ज्ञानेश्वरीच्या दुसऱ्या अनेक प्रतींतील ओंव्यांच्या विसंगत क्रमाच्या योगानें वाचकांचा होणारा घोटाळा टळेल असा भरंवसा आहे. पदपाठ ठाम ठरवितांना व ओंव्यांचे अर्थ देतांना, ज्ञानेश्वरांची परिपाठी लक्षांत घेऊन सरळ व बुद्धिगम्य अर्थ करण्याचाच प्रयत्न केला आहे. प्रस्तुत प्रतींतही बाराव्या अध्यायाप्रमाणेंच ज्ञानेश्वरीच्या सोळाव्या अध्यायाच्या बहुविध व सांगोपांग अभ्यासाची दिशा दाखविण्याचा उपक्रम केला असल्यामुळें, तो विद्यार्थ्यांना व सर्वसाधारण अभ्यासकांना उद्बोधक व मार्गदर्शक होईल अशी आशा आहे.

कोल्हापूर
१०।९।१९४७

द. सी. पंगु

## या आवृत्तींतील पाठभेदांत आलेलीं सांकेतिक अक्षरें

रा.— राजवाडेप्रत.

मा.— माडगांकरप्रत.

सा.— साखरेप्रत.

ज्ञानेश्वरीच्या भाषेस लागू पडणारे भाषाशास्त्राचे

## सामान्य नियम

( १ ) यकारांत व ह्कारांत विरहित, अकारांत नामें अथवा विशेषणें उकारांत होतात. उदा. सुदीनु [ ओ. २ ] मोक्षु [ ४ ], चोखु [ १४७ ], अधिकु [ २४० ].

( २ ) ष किंवा क्ष च्या ऐवजीं ख येतें. उदा० रोखु [ २४० ], पाखाणु [ २४५ ], खेवों [ १४ ], तीख [ ११५ ], आखरांचे [ २२३ ].

( ३ ) ऋ चा अ, इ किंवा उ होतो. उदा० रिणियां [ १६२ ], दिठी [ २७४ ].

( ४ ) प ज्यावेळीं शब्दाच्या आरंभीं नसेल तेव्हां त्याचें व होतें. उदा० मवणी ( ३३१ ), लेवे ( ३८९ ). तसेंच त्याचें कधीं कधीं त होतें. उदा० तातला [ २३७ ]. उलट त बद्दल प ही झालेलें आढळतें. उदा० रूपली [ १४२ ].

( ५ ) शब्दांच्या आरंभीं ट नसतां, त्याचें ड होतें. उदा० आडवीं [ ३४ ]. तसेंच क चें ग व ध चें झ होतें. उदा० मुगुतिबाला [ २०८ ] माजीं [ ६८ ].

( ६ ) श, ष, बद्दल स येतें. उदा० सके [ २८४ ], भास [ २८६ ], स्नाव्यत्वें [ ११८ ], पोसीत [ १९८ ].

( ७ ) जोडाक्षराकरतां साधें अक्षर येतें, व असें होतांना जोडाक्षरामागील वर्ण दीर्घ होतो. उदा० साचे-सत्य [ ३०० ] आगि—अग्नि [ २३७ ], आनु—अन्य [ ३५४ ].

( ८ ) ज्या दोन व्यंजनांचें जोडाक्षर होतें, त्यांपैकीं एकांत किंवा दोन्हींत मध्येंच स्वर येऊन मिळतो. उदा० संवसारि [ २६० ], वरिषात्यागे [ ११३ ], कवतिकिणी ( ६१ ) मुगुतीत्राला ( २०८ ).

( ९ ) कित्येक शब्दांतील पहिला, मधला किंवा शेवटचा वर्ण लुप्त होतो. उदा० पसरु—प्रसरु ( १८४ ), पावी—पाहावी ( २३ ), पांता—पाहतां ( २८२ ), विर्शी—विषयीं ( ४७ ), फुडे—स्फुटं ( १५३ ).

( १० ) कांहीं शब्दांच्या पहिल्या, मधल्या किंवा शेवटच्या अक्षरांत ह येऊन मिळतो. अगर त्याबद्दल ह येतो. उदा० सांधितलें ( २५१ ), सवर्घ ( ४२७ ), निफजे ( ५५ ), फोकरिजे ( ३२७ ), महुर ( १२२ ), लाहणा ( ४६ ).

( ११ ) ज्य शब्दांच्या शेवटीं ' अय ' असेल त्याबद्दल ओ होतो. उदा० विस्मो ( ७८ ).

---

॥ श्री ॥

मावळवीत[1] विश्वाभासु । नवल[2] उदैजेला[3] चंडांशु । अद्वया-
ब्जिनीविकाशु । वंदू आतां ॥ १ ॥ जो अविद्ये राती[4] रुसौनियां[5] ।
गिळी ज्ञानअज्ञानाचिया[6] चांदणियां । जो सुदीनु[7] करी ज्ञानियां ।
स्वबोधाचां ॥ २ ॥ जेणें विवळतिये[8] सवळे[9] । लाहोनि[10] आत्म-
ज्ञानाचे डोळे । सांडीति देह[11] अहंतेचें आंविसाळें[12] । जीव-
पक्षी ॥ ३ ॥ लिंगदेहकमळांचा । पोटीं वेचतेयां[13] चिद्भ्रमराचा ।
बंदि[14] मोक्षु जेयाचां । उदैला होये ॥ ४ ॥ शब्दाचिया आस-[15]
कडी । भेदनदींचां दोहीं थडीं । आरडातें[16] विरहवेडीं[17]
बुद्धिबोधें[18] ॥ ५ ॥ तया[19] चक्रवाकांचें मिथुन । सामरस्याचें[20]
समाधान । भोगवी जो चिद्गगन-। भवनदिवा ॥ ६ ॥ जेणें पहालेनि[21]
पाहाटे । भेदाची चोरवेळ[22] फिटे । रिगती आत्मानुभववाटे ।
पांथिक[23] योगी ॥ ७ ॥ जेयाचेनि[24] विवेककिरणसंगें ।
ऊन्मेखसूर्यकांतस्फुलिंगें[25] । दीपले जाळिती दागें । संसाराचीं ॥ ८ ॥
जेयाचा रश्मिपुंजु निबरु । होता स्वरूपउखरीं[26] स्थिरु । ये महा-

---

१ मावलवितु—रा. २ उवल—रा. ३ उदैला— मा. उदयला—सा. ४ अविद्याराती—सा. ५ रुसोनियां—सा. ६ ज्ञानाज्ञानचांदणियां—मा. सा. ७ सुदिन—मा. सा. ८ विवलतिये—रा. ९ सवले—रा. १० लाहूनि—रा. ११ देहाहंतेचें—मा; देहाहंतेची—सा. १२ आंविसाळें--मा. १३ वेचतया—मा. वेचु तया—सा. १४ बंदीमोक्ष—मा. १५ अशंकडी—रा. १६ आरडातें—मा. आरडत—सा. १७ विरहवेडी—रा. १८ बुद्धिबोधीं—रा. १९ तें याचकांचें—रा. २० समरस्याचें—रा. २१ पाहालिये—मा. २२ चोखेल—रा. चोरळी—मा. २३ पंथिक—रा. २४ जयाचेनि—मा. सा. २५ फुणगे—मा. सा. २६ स्वस्वरूपउवारीं—रा.

सिद्धीचा पूरु । मृगजळाचा[1] ॥ ९ ॥ जो प्रत्यग्बोधाचेया माथेया । सोहंतेचां मध्यान्हीं आलेयां । लपे आत्मभ्रांतिछाया । आपणपां [2]चि ॥ १० ॥ ते वेळीं विश्वस्वप्नें[3] सहितें । कोण अन्यथामतिनिदेतें[4] । सांभाळी, नुरे चि जेथें मायाराती ॥ ११ म्हणौनि अद्वयबोधपाटणीं । महानंदाचिया दाटणीं । मग [5]सुखानुभूतिची घेणीं देणीं । [6]मंदावो लागति ॥ १२ ॥ किंबहुना ऐसैसें । [7]मुक्तातें कैवल्यसुदिसें । सदा [8]लालिजे कां प्रकाशें । जेयाचेनि ॥ १३ ॥ जो निंजधाम-व्योमीचा राऊ । उदैला चि उदैजतखेऊ । फेडी [9]पूर्वादिदिशांचा ठावो । उदोअस्तूंचा ॥ १४ ॥ न दिसणें दिसणेनसीं मावळवी । दोहीं[10] झाकलें सैंघ प[11]धलवी । [12]काइ बोलों आघवी । [13]उखा चि ते आनी ॥ १५ ॥ तो अहोरात्राचा पैलकडु । कोणें देखावा ज्ञानमार्तंडु । [14]प्रकाश्येविण सुरवाडु । प्रकाशाचा ॥ १६ ॥ तेया चित्सूर्या श्रीनिवृत्ती । [15]आतां नमो म्हणों पुडतपुडतीं । [16]जो बाधकां येई-जताहे स्तुती । बोलाचियां? ॥ १७ ॥ [17]वेदांचें मान पाउनियां । स्तुती तरी येईजे चांगावेया । जरि स्तव्यबुद्धीसीं लया । जाइजे कां ॥ १८ ॥ जो सर्व नेणिवां जाणिजे । मौनाचियां मिठिया [18]वानिजे ।

---

१ मृगजळ तें--सा. २ तळीं--सा. ३ विश्वस्वप्नसहितें--मा. ४ निद्रेतें--मा. ५ सुखानुभूतीचीं घेणीं--मा; सुखानुभौ तिहीं घेणीं--रा. ६ मंदावों लागे--रा. ७ मुक्तकैवल्यसुदिवसें--मा. सा. ८ लाहिजे--मा. सा. ९ पूर्वादिदिशांसि--सा; पूर्वादिदिशीशीं--मा. १० दोहीं--मा. सा. ११ पल्हावी--मा; पालवी--सा. १२ काय बहु बोलों तें आघवी--मा. सा. १३ उखाचि आनी--मा. सा. १४ जो प्रकाश्येंवीण -मा. सा. १५ आतां नमोचि म्हणें पुडुतीं--रा. १६ जे--मा. सा. १७ देवाचे महिमान पाहूनिया--मा. सा. १८ वर्णिजे--रा.

कांहीं चि नें हुनि आणिजे । आपणेयां जो ॥ १९ ॥ जेयां तुझेया उद्देशा साठीं । पश्यंती मध्यमापोटीं । सूंनि परेसीं ही पाठीं । वैखरी विरे ॥ २० ॥ तेया तूतें मी सेवकपणें । लेववीं बोलकेयां स्तोत्रांचें लेणें । हें उपसाहावें हीं म्हणतां उणें । अद्वयानंदा ॥ २१ ॥ परि रंकें अमृतसागरु । देखिलेयां पडे उचिताचा विसरु । मग करुं धांवे पाहुणेरु । शाकांचा तेया ॥२२॥ तेथ शाकु किरु बहुत म्हणावा । तेयाचा हर्षवेगु चि तो घेयावा । उजलोनि दिव्यतेजा हाथैवा । ते भाक्ति पावी ॥ २३ ॥ बाळा उचित जाणणें होये । तरी बाळपण चि कें आहे । परि साच चि येरी माये । म्हणौनि तोषे ॥ २४ ॥ हा गा गांवरसेया भरलें । पाणी पाये देंत वरि आलें । तें गंगा काय म्हणितलें । परतें सर ॥ २५ ॥ जी भृगूचा कैसा अपकारु । कीं तो मानूनि प्रिय उपचारु । तोषे चि ना शार्ङ्गधरु । गुरुत्वासी ॥ २६ ॥ कां आंधारेनि खतैलें अंबर । जालेयां दिवसनाथा समोर । तेणें तें परतें सर । म्हणितलें कायी ॥ २७ ॥ तेविं भेदबुद्धीचिये तुळे । घालूनि सूर्यश्लेषाचें कांटाळें । तुकिलासि तें

---

१ नोहुनि–रा. न होनि–सा. २ आपणपयां– मा. सा. ३ जयाचया– मा; तया तुझिया– सा. ४ सुनू– रा. ५ उपसाहें– मा. ६ अमृताचा सागरु– मा. सा. ७ धांवे करुं– मा. सा. ८ उचलुनु–मा. उजळूं– रा. ९ हातिवा–मा. सा. १० ते भक्तीचि पाहावी– मा. सा. ११ गांवरसा–मा; गांवरसें–सा. १२ पाणी पाठीं पाय देत आलें–मा. सा. १३ देखिलें–रा. १४ आनी दिटी–रा. १५ जी चांगु कैसा अपकारु । किं तो मानूनि प्रियउपकारु । –रा. १६ पूतनेसी–रा. १७ पऱ्हां–मा. सा.

रिझति[1] जीवें । तृणाहूनि[2] आघवें । मानिति नीच॥ ३७९ ॥ वरि धनाचिया मदिरा । माजौनि धनुर्धरा । कृत्याकृत्यविचारा[3] । सवते[4] केले ॥ ३८० ॥ [5]जे आंगि आइति ऐसी । तेथ यज्ञाची गोठि कायिसी । तऱ्ही [6]काइ काइ[6] पीसीं । न करिती गा ॥ ३८१ ॥ म्हणौनि कोण्हें येळें वेळें । मौढ्यमदाचेनि[7] बळें । यागाचें[8] हि टवाळें । आदरीति ॥ ३८२ ॥ ना कुंडें[9] मंडप [10]वेदी । कां उचितसाधनसमृद्धी । आणि तेयांसी चि[11] तंव विधि । [12]दंद चि [13]किर ॥ ३८३ ॥ देवां ब्राह्मणाचेनि नावें । [14]तेउते [14]वारेन हीं नोहावे । [15]ऐसें तेथ देयावें । लागैल कवणां ॥ ३८४ ॥ पैं वासुरुवांचा भोकसा । गायी पुढां ठेउनि जैसा । उगाणा घेंति क्षीर-रसा । बुद्धिमंत[16] ॥ ३८५ ॥ तैसें यागाचेनि नांवें । जगा[17] वाउनि हांवे । नागवीति आघवें । ऐहेरा[18] वाऱ्हीं[19] ॥ ३८६ ॥ ऐसा काहिं आपुलिया । होमीति जे उजरिया । तेणें कामिति प्राणियां । सर्वनाशु[20] ॥ ३८७ ॥

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ॥
मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

---

१ रिझतां-मा. सा. २ तृणाहिहूनि—मा. सा. ३ विसरा-रा. ४ सोवतें—मा. सा. ५ जया—मा. सा. ६ काय काय—मा. सा. ७ मौढ्यमद्याचेनि—मा. सा. ८ यागाचींही—मा. सा. ९ कुंडे—मा. सा. १० वेली—रा. ११ हा शब्द माडगांवकर व साखरेप्रतींत नाहीं. १२ द्वंद्व-सा. १३ सदा—मा. सा. १४ आडवारेनहि नव्हावें-मा. सा. १५ आथी तेथ यावे-सा. ऐसें तेथ यावें-मा. १६ बुद्धिवंत—मा. सा. १७ जग—सा. मा. १८ अहेरां—मा. १९ वारी—सा. २० सर्व नाश—मा.

मग पुढां भेरी निसाण । लाउनि तैं दीक्षितपण । जगीं फोकरीति आण । [1]वायों वायों ॥ ३८८ ॥ ते[2]धवां महत्त्वें तेणें अधमां । [3]तेयां सगरवां हि चढे महिमा । जैसे लेवे दीधले तमा । काजळाचे ॥ ३८९ ॥ तैसें मौढ्य घणावे । [5]अहंकारु दुणावे । [4]औद्धत्य उंचावे । [6]अविवेकु हि ॥ ३९० ॥ मग दुजेयाची भाक । नुरावया निःशेष । [7]बळियेपणें आणिक । होयें[8] बळ ॥ ३९१ ॥ ऐसा अहंकारा बळा । जालेयां एकवळा । दर्पसागरु वेळा[9] । सांडुनि उते ॥ ३९२ ॥ मग वोसंडलेनि दर्पे । कामा हिं पीत्त कुरुपे । तया धगी सैंघ पळिपे । [10]कोधाँग्निची ॥ ३९३ ॥ तेथ उन्हाळा आगि [11]पुरा । तेलातूपाचेया कोठीं[12]रां । लागला, आणि वारा । सूटला जैसा ॥ ३९४ ॥ तैसा अहंकारु [13]आला बळा । दर्पु कामक्रोधीं [14]रूढला । [15]एयां दोहींचा मेळा । जेयाचां ठांइं ॥ ३९५ ॥ ते [16]आपुलिया स्वैछीं[17] । मग कोणी कोणी ठांइं[18] हिंसा । यां प्राणियांतें वीरेशा । न सांधीति[19] गा ॥ ३९६ ॥ पहिलें तंव धनुर्धरा । आपुलिया मांसां[20] रुधिरा । वेचु करिति अभिचारा- । लागौनियां ॥ ३९७ ॥ तेथ जाळितु [21]तियें देहें । [22]तेयां माझि

---

१ वावों वावों—मा. सा. २ तेव्हां—मा. सा. ३ गर्वा चढे महिमा—मा. सा. ४ औद्धत्य उंचावे—मा. सा. ५ अहंकारु दुणावे —मा. सा. ६ अहंभा-उ^—रा. ७ बळियेपणा अधिक—मा. ८ होय—मा. सा. ९ मर्यादवेळा—सा. १० क्रोधाग्नि तो—मा सा. ११ खरमरा—मा सा. १२ घठारा—रा. १३ बळा आला—मा. सा. १४ गुढला—मा. सा. १५ या दोहींचा मेळु जाला—मा. सा. १६ तो—रा. १७ सवेशा—मा. सा. १८ हा शब्द माडगांवकर व साखरेप्रतींत नाहीं. १९ सधीति—रा. २० मांस – मा. सा. २१ जियें—मा. सा. २२ यां माजी जो मी आहे—मा. सा.

मी आहे । तेया आत्मेयां मज घाए । वाजती ते ॥ ३९८ ॥ आणि अभिचारिकिं तिहीं । [1]उपद्रवीति जेतुलें काहीं । [2]चैतन्य मी चि[3] पाहिं । सीणु पावे ॥ ३९९ ॥ ऐसें[4] अभिचारा वेगळे । विपायें जे अवगले । ते टाकीति [5]एटाळें । पैशून्याचिं ॥ ४०० ॥ सतिया[6] संतपुरुष । दानशीळ याज्ञिक । तपस्वी अलौकिक । संन्यासी जे ॥ ४०१ ॥ कां भक्त ह्यान महात्मे । तियें[7] माझीं [8]निजधामें । निर्वाळली [9]होमें धर्मे । श्रौतादिकीं ॥ ४०२ ॥ तेया द्वेषाचेनि कालकूटें । बासटूनि तीखटें । कुबोलाचिं सदटें । सिंथिति[10] कांडें ॥ ४०३ ॥

**तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।**

**क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥**

ऐसें [11]आघवेया चि परीं । प्रवर्त्तले माझां वैरीं । [12]तेयां पापियां [13]मी करीं । तें आइक पां ॥ ४०४ ॥ तरि मनुष्यदेहाचा तागा । घेउनि रुसति [14]जगा । ते पदवी हिरौनि पैं गा । ऐसे ठेवीं ॥ ४०५ ॥ [15]जे क्लेशगाविंचा उकरडा । भवपुरिंचा [16]पानवडा ।

---

१ उपद्रविजे—मा सा. २ तेथ चैतन्य—मा. सा. ३ हा शब्द माडगांवकर व साखरेप्रतींत नाहीं. ४ आणि—मा. सा. ५ इटाळें—मा. सा. ६ सतीं—मा. सा. ७ इयें—मा. सा. ८ निजाचीं-मा. सा. ९ होमधर्में—मा. सा. १० स्तुति—सा; सुती—मा. ११ अवघाचि—मा. १२ तरि तयां—मा. १३ जें मी—मा. सा. १४ जे जगा—मा. सा. १५ हा शब्द राजवाडेप्रतींत नाहीं. १६ पाणवाडा—रा.

ते तमोयोनि तेया [1]कुंडा । [2]वृत्ति मी दे ॥ ४०६ ॥ मग आहारा-चेनि नांवें । तृण हीं जेथ नुगवे । ते व्याघ्र वृक [3]अडवे । तैसियां[4] करिं ॥ ४०७ ॥ तेथ क्षुधादुःखें बहुतें । तोडुनि[5] खांतां [6]आपण-पेयातें । मरों[7] [7]मरो माघौते । [8]होतें चि असति ॥ ४०८ ॥ कां आपुलां गरलज्वाळीं । [9]जाळीं तेयां[9] आंगांचि पेंदळी । ते सर्प चि करीं बिळीं । निरुंधला ॥ ४०९ ॥ परि [10]घेउनि श्वासु घापे[11] । येतुलेन हिं मापें । विसांवां तेयां लिपे[12] । [13]अर्जुना गा ॥ ४१० ॥ ऐसेन कल्पांचिया कोडी । गणितां हीं संख्या थोडी । तेतुला वेळु न कढी । क्लेशौनि तेयां ॥ ४११ ॥ तऱ्ही तेया[14] जेथ जाणे । तेथिचें हें पहिलें पेणें । तेयाहुनु[15] ये दारुणें । [17]नऱ्हंति दुःखें ॥ ४१२ ॥

**आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।**
**मामप्राप्यैव कौंतेय ततो यांत्यधमां गतिम् ॥ २० ॥**

हा [18]ठाऊ वेऱ्हीं घोरीं[19] । संपत्ति[20] ते[20] आसुरी । अधोगति अवधारिं । जोडिलीं तिहीं ॥ ४१३ ॥ पाठिं व्याघ्रादि तामसा । योनि तो अळुमाळु ऐसा । देहाधाराचा उसासा । आथि जो हीं[21] ॥ ४१४ ॥

१ मूढां–मा. सा. २ वृत्तिचि दें–मा. सा. ३ आडवे— मा. ४ तैसिये–सा. मा. ५ तोडुनु—मा. तोडूनि–सा. ६ आपणयातें–मा. ७ मरमरों–मा. सा. ८ होत–मा. सा. ९ जळतया–मा. जाळिती–सा. १० घेतला–मा. सा. ११ उघापे—मा. १२ नाटोपे-मा. सा. १३ दुर्जनासीं–मा. सा. १४ तयांसिं जेथें–सा. मा. १५ पाउनी-मा. पावोनि—सा. ते पाहुनु-रा. १६ येरें–मा. १७ न हीती–सा. मा. १८ ठावोवरी–मा. सा. १९ घरीं–रा. २० ते संपत्ति–मा. २१ हि–मा. ही–सा.

तो हि मीं वोलावा[१] हिरें । मग तम चि होतियकसरें[२] । तेथ[३] गेलें अंधारें । [४]काळवंडिजे ॥ ४१५ ॥ जेयाचिया [५]चिळसी । नरक घेंति विवसी । सीणु जाये [६]मूर्सी । [७]शिंणे जेंणे ॥ ४१६ ॥ मळु जेणें मैळे । तापु जेणें पोळे । जेयाचेनि नांवें सळे । महाभय ॥४१७॥ ऐसे विश्वाचेया वोखटेया[८] । अधम जे धनंजया । ते ते होंति [९]भोगावेया । तामसा योनी ॥ ४१८ ॥ आहा सांघतां वाचा रडे । आठवितां मन खिरडे । कट रे मूर्खि कवडें । जोडिले निरय[१०] ॥ ४१९ ॥ काइसेया[११] ते आसुर । संपत्ति [१२]जोडावी वाउर । जिया दीधलें [१३]घोर । पतन ऐसें ॥ ४२० ॥ म्हणौनि तुवां धनुर्धरा । न व्हांवें गा तिया मोहरा । जेउता वासु असुरा । संपत्तिवंतां ॥ ४२१ ॥ आणि दंभादि दोष [१४]सांई । हे संपूर्ण जेयाचां ठाइं । ते त्यजावें हें चि काई । म्हणो [१५]किर ॥ ४२२ ॥

**त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।**
**कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्त्रयं त्यजेत् ॥ २१ ॥**

परि काम क्रोध लोभ । [१६]येयां तिहींचें [१७]थोंब । थांवे तेथ अशुभ । [१८]पिकलें जाण ॥ ४२४ ॥ सर्वदुःखा आपुलेया ।

---

१ वोल्हावा–मा. सा २ एकसरें–मा. सा. ३ जेथ–मा. सा. ४ काळवंडैजे–मा. सा. ५ पाप चिळसी–मा. पापा. चिळसी–सा. ६ मूर्छा–मा. सा. ७ साणें–रा. ८ खटेया–रा. सा. ९ भोंगुनियां–मा. सा. १० होणें–रा. ११ कायिसया–मा. सा. १२ पोषावी–मा. पोषिती–सा. १३ थोर–रा. १४ साही–मा. सा. १५ कीर–मा. सा. १६ या–मा. सा. १७ तिहींचे चिंबिन–रा. १८ प्रकाशलें–रा.

[1]दर्शन धनंजया । [2]पाढाउ भलतेया । दिधले आथि ॥४२४॥ कां पापिया नरकभोगीं । सुवावेया लागि जगीं । पातकांची दाटुगी सभाचि हे ॥ ४२५ ॥ ते रौरव गा [5]तवं वेरि । आइकिजति गा अपटांतरीं । [6]जवं तीन्हीं अंतरीं । उठीति नां हे ॥ ४२६ ॥ अपायें [9]येणें आसलग । यातना इहिं [10]सन्नधें । हाणि हाणि [11]नोहे तीघ। हे चि हाणी ॥ ४२७ ॥ काइ बहू बोलों[12] सूभटा । सांघितलेयां निकृष्टा । नरकाचा दारवठां । [13]त्रिशंकु हा ॥ ४२८ ॥ ययां[14] काम क्रोध लोभा-। माजि जीवें जो होये उभा । तो निरयपुरीची सभा । [15]पातला जाण ॥ ४२९ ॥ म्हणौनि [16]पुडुतीं किरीटी। हे कामादि दोष त्रिपुटी । त्यजावी गा वोखटी । आघवां विखी[17] ॥ ४३० ॥

**एतैर्विमुक्तः कौंतेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।**
**आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥**

धर्मादिक [18]चहुं आंतु । पुरुषार्थाची तैं चि मातु । करावी जैं सांघातु । सांडील हा ॥ ४३१ ॥ हे तीन्ही जिवी[19] जागती ।

---

१ दर्शना–मा. सा. २ पाढाउ हे–मा. भलेया–रा. भलेतया–मा. ४ आइाती–मा. सा. ५ तंव चि–मा.सा.६ जवं हे–मा. सा.७ उठती ना–मा. सा. ८ अपाय–मा. सा. ९ इहीं–मा. तिहीं–सा. १० सवंघ- मा. सा. ११ नव्हे–मा. नोहे हे–सा. १२ बोलां–मा. १३ त्रिसांकु–रा. १४ या–मा. १५ सन्मानु पावे–सा. सन्मानु पावों–मा. १६ पुढुतपुढुतीं–मा. पुढत पूढतीं–सा. १७विषीं–मा. विषयीं–सा. १८ चौंहीं–मा. सा. १९ जीवी जंव–मा. सा.

[1]आणि [2]निकेयाचि प्राप्ति । हे माझे कान नाइकती । देवो[3] म्हणे ॥ ४३२ ॥ जें[4] आपणपें पढिये । आत्मनाशा जो भिये[5] । ते तेणें न धरावी सोये[6] । [7]निश्चयेंसीं ॥ ४३३ ॥ पोटीं बांधौनि पाखाण । समुद्रिं बाहिं आंगवण । कां जियात्रेया जेवण । कालकूटाचें ॥४३४॥ इहीं कामक्रोधलोभेंसीं । [8]कार्यें सिद्धति तैंसी । म्हणौनि ठावो चि पूसीं । येयांचा गा ॥ ४३५ ॥ जैं काहीं अवचटें । हे तिकडी सांखळ फीटे[9] । तैं सुखें आपुलिये वाटें । चालों लाभे ॥ ४३६ ॥ त्रिदोषीं सांडिलें शरीर । त्रिकुटी फीटलेयां नगर । [10]त्रिदाघ निमालेयां अंतर । जैसें होये ॥ ४३७ ॥ तैसा कामादिकीं तिघीं । सांडिला सुख [11]पावे जगीं । संगु लाहे मोक्षमार्गीं । सज्जनांचा ॥ ४३८ ॥ मग सत्संगें प्रबळें । सच्छास्त्राचेनि बळें । जन्ममृत्युचिं निमाळें । निस्तरें रानें ॥ ४३९ ॥ [12]तेव्हां आत्मानंदें आघवे जे सदा वसतें बरवें । तें तैसें चि पाटण पावे । गुरुकृपेचें ॥ ४४० ॥ तेथ प्रियाची पैली[13] सीमा । [14]ते भेटे माउली आत्मा । [15]तिये क्षेवीं[16] आटे डिंडिमा । सांसारिक हे ॥ ४४१ ॥ ऐसा[17] जो

---

१ तंववरी–सा. मा. २ निकियाची—सा. निकयाची–मा. ३ देवहि–मा. देवोहि—सा. ४ जंया–मा. सा. ५ बिहे—सा. ६ हे सोये–मा. ७ सावधां होइजे–मा. सावधु होइजे–सा. ८ कार्यसिद्धि जाणता तैसी–मा. सा. ९ तूटे—मा. सा. १० त्रिदाह –सा. ११ पावौनि—मा. पावोनि–सा. १२ ते व्हेळीं–मा. ते वेळीं–सा. १३ परम–मा. सा. १४ तो–मा. १५ तया–सा. तये—मा. १६ खेवीं–मा. सा. १७ हा शब्द राजवाडे-प्रतींत नाहीं.

कामक्रोधलोभां । झाडि करुनि, ठाके उभा । [1]तो [2]एवडेया [3]येया लाभा । गोसाविं [4]होए ॥ ४४२ ॥

**यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ॥**
**न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥**

ना हें नावडौनि कांहीं । कामादिकांचा[5] ठांइं । [6]दाटिलें जेणे डोईं । आत्मचोरें ॥ ४४३ ॥ जो जगीं समान सकृपु । हिताहितु दाविता दीपु । तो अमान्यु केला बापु । वेदु जेणें ॥ ४४४ ॥ न धरी चि विधिची भीड । न करि चि आपुली चाड । वाढवीतु गेला कोड । इंद्रियांचें ॥ ४४५ ॥ कामक्रोधलोभाची कास । न सोडी चि पाळिली भास । स्वैराचाराचें असोस । [7]रान रिगाला ॥ ४४६ ॥ तो सूटकेचिया वाहाणी । मग पियों[8] न लाहे पाणी । स्वप्नीं हीं ते काहाणी । दूरी चि तेया ॥ ४४७ ॥ [9]संसारबंध जाये । [10]हें किर तेयाचें कें आहे । परि तो इहिकीं[11] न लाहे । [12] विषय भोगूं ॥ ४४८ ॥ तरि [13]माशालागि भूलला । ब्राह्मणु [14]पाण-बुडा रिगाला । [15]किं तेव्हां चि तेथ लागला । [16]आगि जैसा ॥ ४४९ ॥ तैसें विषयाचेनि कोडें । परत्रा केलें [17]उबडें । तंव

---

१ तोचि–मा. सा. २ एवढिया–सा. एवढ्या–मा. ३ या–मा. ४ होय–सा. मा. ५ कामादिकांचा चि–मा. कामादिकांच्या—सा, ६ दाटिली–मा· सा. ७ वळघला रान–मा. सा. ८ पिवों-मा. ९ आणि परत्र तंव जाये–मा. सा. १० हें कीर तया आहे—मा. सा. ११ ऐहिक हि–मा. सा. १२ भोग—मा. सा. १३ मांसा—रा. १४ पाणवडां—रा. १५ कीं तेथहीं पावला–मा. सा. १६ नास्तिकवादु—मा. सा १७ उघडें–मा.

तो चि [1] आनी कडे । मरणें नेला ॥ ४५० ॥ एवं परत्र ना स्वर्गु । [2]इहिक ना विषयभोगु । तेथ केउता प्रसंगु । मोक्षाचा तो ॥४५१॥ म्हणौनि कामाचेनि बळें । [3]विषयो चरों पाहें ढाळें । तेया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥ ४५२ ॥

**तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ**
**ज्ञात्वा शास्त्रं विधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥**

या कारणें पैं बापा । जेया आपुली आथि कृपा । तेण वेदांचिया निरोपा । आन न कीजे ॥ ४५३ ॥ पतिचेया व्रता । [4]अनुसरे पतिव्रता । अनायासें आत्महिता । भेटे जेवि [5] ॥ ४५४ ॥ नातरि श्रीगुरुवचना । दीठि देंतु जतना । शिष्यु आत्मभवना । [6]माझि पैसे ॥ ४५५ ॥ हें असो आपुला ठेवा । जरि हाता आथि यावा । तरि आदरें जेवि दीवा । पुढां कीजे ॥ ४५६ ॥ तैसा अशेषां पुरुषार्थां । जो गोसांवि हों म्हणे पार्था । तेणें [7]श्रुती स्मृती माथा । बसों [8] घापे ॥ ४५७ ॥ शास्त्र म्हणैल सांडावें । तें राज्य ही तृण मानावें । जें घेववि तें न [9]मनावें । विष ही वीरुं [10] ॥ ४५८ ॥ एसी [11] वेदैक निष्ठा । जालेयां सूभटा । तरि कें आहे अनिष्टां । भेटणें गा ॥ ४५९ ॥ पैं अहिता पासौनि काढिती । हित देऊनि वाढविती । [12]नार्हि श्रुती परौती । माउली [13]जगीं ॥ ४६० ॥ म्हणौनि ब्रह्मेंसि मेळवी ।

---

१ आणिकीवडे–सा. २ ना एहिकी–मा. ना हेहिकही–सा. ३ जो विषय सेऊं पाहे सळें ।—मा. ४ अनुसरोनि–मा. सा. ५ चि ते—मा. सा. ६ माजि–मा. सा. ७ श्रुतिस्मृति–सा. श्रुतीं स्मृतीं—मा. ८ बैसणें— सा. मा. ९ म्हणावें–मा. सा. १० विरुद्ध—मा. सा. ११ ऐसिया—मा. सा. १२ नाहीं गा—सा. १३ जगा–सा. मा.

वं हे कोण्ही न संडावी । अगा तुम्हां[1] ऐसां भजावीं । विशेषेसीं ॥ ४६१ ॥ जें आजि [2]तूं [2]अर्जुना एथें । करावेया[3] [3]शास्त्रें सार्थें । जन्मलासि बळार्थें । धर्माचेनि ॥ ४६२ ॥ आणि [4]धर्मा अनुज हि ऐसें । हें [5]ओघें चि आलें आपैसें[6] । म्हणौनि अनारिसें । करूं नये ॥ ४६३ ॥ कार्याकार्यविवेकीं । शास्त्रें चि करावी पारखी । [7]अकृत्य तें[7] लोकीं । वाळावें गा ॥ ४६४ ॥ मग कृत्य-पणें खरें निगे । ते तुवां आपुलेनि आंगें । आचरौनि आदरें चांगें । सारावें चि ॥ ४६५ ॥ जे [8]विश्वप्रमाणिची मुदी । आजि तूझां हातीं सुबुद्धी । [9]लोकसंग्रहासी त्रिशुद्धी । योग्यु होसी ॥ ४६६ ॥ एवं आसुरवर्गु आघवा । सांघौनि तेथिचा निगावा । तो ही देवें पांडवा । निरोपिला ॥ ४६७ ॥ [10]या वरि तो पांडुचा । [11]कुमरु, भाऊ जीवाचा । पुसैल, तें चैतन्याचां । कानीं आइकां ॥ ४६८ ॥ संजयें व्यासाचेया निरोपा । तो वेळु फेडिला तेया नृपा । तैसा मी हीं निवृत्ति कृपा । सांघैन तुम्हां ॥ ४६९॥ तुम्हीं संत माझिया कडा । दीठिचा कराल [12]बहुडा । तरि तुम्हां मानें येवढा । होईन मी ॥ ४७० ॥ म्हणौनि निज अवधान । मज ऊळगे पसायदान । दीजो जी [13]क्षमी होईन । ज्ञानदेऊ म्हणे ॥४७१॥

इति श्रीभावार्थदीपिकायां ज्ञानदेवविरचितायां षोडशोऽध्यायः ॥१६॥
॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ श्लोक २४, ओंव्या ४७१

---

१ तुम्हां हि—मा. सा. २ अर्जुना तूं—सा. ३ करावया सत्‌शास्त्रें—मा. करावया सत्य शास्त्रें—सा. ४ धर्मानुज—सा. मा. ५ ओघें चि—रा. ६ पैसें—रा. अपैसें—सा. ७ अकृत्यत्व—रा. ८ विश्वप्रामाण्याची—मा. सा. ९ लोकसंग्रहाची—रा. १० इयावरी—सा. ११ कुमर सद्भावो जीवींचा—मा. कुमरु सद्भावो जीवींचा—सा. १२ बहुवाडा—रा. १३ सनाथ—सा.

# टीपा व स्पष्टीकरण.

ज्ञानेश्वरांच्या नित्याच्या पद्धतीप्रमाणें याही अध्यातांत प्रास्ताविक निवेदन करण्याच्या हेतूनें त्यांनीं पहिल्या ६६ ओंव्या योजिल्या आहेत. त्यांतही पहिल्या चाळीस ओंव्यांत, आपले गुरु जे निवृत्तिनाथ, त्यांच्यावर ज्ञानसूर्याचें रूपक करून त्यांना नमन केलें असून, सद्‌गुरुकृपा=परमात्मालाभ, व परमात्मलाभ=अज्ञानांधकारनाश, असें अध्यात्मिक समीकरण त्यांनीं मांडलें आहे. निवृत्तिनाथरूपीं ज्ञानसूर्याच्या कृपेमुळेंच आपल्या अज्ञानाचा नाश झाला असें सांगण्याचा ज्ञानेशांचा आशय आहे. पुढील २२ ओंव्यांत सोळाव्या अध्यायाचें प्रयोजन वर्णन केलें आहे. वास्तविक गीतेच्या पंधराव्या अध्यायांत पुरुषोत्तमयोग विस्तारानें वर्णन करून सांगितल्यावर गीतेचा प्रतिपाद्य विषय जो अध्यात्मज्ञान, त्याची परिणतीच झाली आहे. मग 'दैवासुरसंपद्' सांगण्यासाठीं आणखी सोळावा अध्याय खर्ची घालण्याचें कारण काय, याचेंच ज्ञानेश्वरांनीं येथें स्पष्टीकरण केलें आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, पुरुषोत्तमप्राप्ति करून घेण्यासाठीं संसाररूपीं तरूचा नाश ज्या ज्ञानरूपी तरवारीनें करावयाचा असें पंधराव्या अध्यायांत सांगितलें, तें ज्ञान कोणत्या गोष्टींनीं टिकवावयाचें, व त्या ज्ञानास विघातक गोष्टीं कोणत्या, याचें विवेचन करणें जरूर असल्यामुळेंच, भगवंतांनीं सोळाव्या व सतराव्या अध्यायांची रचना केली आहे. यावर कोणी अशी शंका घेतील कीं, उपरिनिर्दिष्ट जें ज्ञान, त्याला बाधक होणाऱ्या राक्षसी प्रकृतीचें व पोषक होणाऱ्या दैवी प्रकृतीचें विवेचन मागें नवव्या अध्यायाच्या अनुक्रमें १२ व १३ श्लोकांत आलेंच असल्यामुळें, पुन: तोच विषय सोळाव्या अध्यायांत देण्याचें कांहीं कारण नव्हतें. म्हणून ज्ञानेश्वर येथे सोळाव्या अध्यायाची संगति सांगतांना असें स्पष्टीकरण करतात कीं, मागें नवव्या अध्यायांत तो विषय तसाच राहून गेला. आतां अर्जुनास त्या विषयाची गरज नसली, तरी इतर मुमुक्षु जनांस, ज्ञानास पोषक व बाधक गोष्टीं कोणत्या हें समजणें इष्ट

आहे, आणि त्यासाठींच नवव्या अध्यायांत अपुरा राहिलेला विषय भगवंतांनीं येथें पुरा केला आहे. पंधराव्या अध्यायांत जें अध्यात्मज्ञान सांगितलें, त्याला पोषक व बाधक गोष्टीं सांगणारा सोळावा अध्याय जसा विषयानुक्रमानें सुसंगत आहे, तसाच तो नवव्या अध्यायांत अपुरा राहिलेला भाग पुरा करणारा, अतएव त्याला पूरक म्हणूनही आवश्यक आहे, असा ज्ञानेश्वरांच्या प्रस्तावनेचा एकंदरीत मथितार्थ आहे. ओंव्या ६३–६६ मध्यें या दैवासुरसंपत्तींचा निर्देश करून दैवीसंपत्तीचा उपक्रम करतांना, ' दैवी ' व ' संपत् ' या शब्दांचें अर्थनिरूपण करण्यांत आलें आहे.

ओ. १. **मावळवीत इ.**—ज्ञानेश्वरांनीं येथे सद्गुरूवर ज्ञानसूर्याचें रूपक केलें आहे. जगाचा आभास नष्ट करणारा, व अद्वैतरूपी कमलिनीचा विकास करणारा सूर्य तेजानें उदय पावला आहे. त्याला आपण वंदन करूंया. " ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या । जीवो ब्रह्मैव नापरः ॥ " असें खरें ज्ञान बाणल्यावर, आपल्या भोंवतीच्या जगाचा आभास अथवा माया नष्ट होते. या ज्ञानामुळेंच सर्वत्र अद्वैत अथवा एकच आत्मा आहे, अशा वृत्तीचा विकास होतो. हें ज्ञान सद्गुरुकृपेनें प्राप्त होतें, म्हणुनच ज्ञानेश्वरांनीं त्याला वंदन केलें आहे. **विश्वाभासु**—विश्वाचा आभास, जगाचें मिथ्याज्ञान. **नवल**—आश्चर्यकारक. **अद्वया इ०**—आत्मा व परमात्मा यांचें ऐक्यरूपीकमल. ज्या ज्ञानाच्या उदयानें आत्मापरमात्म्यैक्य उमगून येतें. **उदैजेला**—उगवला गेला–(कर्मकर्तरी)–उगवला. **ओ. २.** येथें सूर्योदयाचेंच रूपक पुढें चालविलें आहे. जो ज्ञानरूपीसूर्य अज्ञानरूपी रात्रीवर रुसतो म्हणजे तिचा नाश करतो, जगांतील ज्ञान व अज्ञानरूपी चांदण्यांना गिळून टाकतो, व जो ज्ञानी लोकांना आत्मज्ञानाची सुप्रभात करतो. सूर्योदयाबरोबर रात्र नष्ट होऊन, चांदण्याही अस्तंगत पावतात. येथें आत्मज्ञानाच्या उदयाबरोबरच, ' जग हें अविनाशी आहे, ' किंवा ' शरीर हाच आत्मा ' इत्यादि भ्रामक अज्ञानाची रात्र संपते. त्याचप्रमाणें ऐहिक जगांत मानलें जाणारें आधिभौतिक शास्त्रांचें ज्ञान, किंवा आपण ज्याला अज्ञान म्हणतो तें अज्ञान, खऱ्या अध्यात्मिक ज्ञानामुळें फोल ठरतें. कारण जेथें

जगच खोटें ठरलें, तेथें ज्ञानविज्ञानही फोल ठरल्यास नवल नाहीं. **सुदीनु** करी—सुप्रभात करी. **स्वबोधाचा**—आत्मज्ञानाची. **ओ. ३.** अशी पहाटेची वेळ प्राप्त झाली असतां, जीवरूपीं पक्ष्यांना आत्मज्ञानाची दृष्टि प्राप्त होऊन, ते आपलें घरटें सोडून बाहेर पडतात. प्रभातकालीं पक्ष्यांना रात्रीं नष्ट झालेली दृष्टि पुनः येते, व ते भक्ष्यशोधार्थ घरट्याबाहेर पडतात. त्याच रूपकाच्या आधारें येथें असें सांगतात कीं, आत्मबोधाचा उदय होतांच सर्व प्राणिमात्राला आत्मज्ञानाची दृष्टि प्राप्त होऊन, ते आपल्या देहावरील अहंतेचा अथवा आसक्तीचा त्याग करतात. आत्मज्ञानाची दृष्टि लाभल्यावर देहावरील ममत्व राहणें कसें शक्य आहे? **विवळतिये**—विवळणें = प्रकाशित होणें. पहा—सूर्य सूर्यासी विवळे। कां फळ आपणपा फळे। परिमळु परिमळे। घेपत असे. ॥ अमृतानुभव ४।२१. **सवळे**—प्रातःकाळीं. ( सं. सुवेळ ) पहा—"राउळो! राउळो! सवळे ताकवणी होआवें असे"—श्री गोविंदप्रभुचरित्र ३८. **लाहोनी** इ०—रात्रीं पक्ष्यांची दृष्टि जाते व पहाट होतांच ती त्यांना प्राप्त होते. त्याचप्रमाणें प्राणिमात्रांच्या जीवदशेंत त्यांची जी दृष्टि गेलेली असते, ती आत्मबोध होतांच त्यांना प्राप्त होते. जीवदशेपूर्वी असणारें आत्मज्ञान, त्यांना पुनरपि प्राप्त होतें. **अविसाळें**—घरटें ( सं—अमिपालय—खाण्याचें मांस सांठवून ठेवण्याचें ठिकाण—अर्थात् घरटें ). पहा— " पक्षिये करीति अविंसाळे: वोळिंबे वावरुळें—" उद्धवगीता ४९०. अज्ञानी प्राणी, देह तोच आत्मा असें मानतो. पण गुरुकृपेचा सूर्य उगवतांच त्याचा हा गैरसमज नष्ट होतो. **जीवपक्षी**—जीवरूपी पक्षी.

**ओ. ४**—सूर्यास्ताबरोबर सूर्यविकासी कमळ मिटतें, व त्यांत मकरंदासाठीं गेलेला भ्रमर एकदम कोंडला जातो. पुनः सूर्योदय होतांच त्या कमलकोशांतून त्याची सुटका होते. हाच कविसंकेत येथे रूपकानें लागूं केला आहे. चिद्रूपी भ्रमर, लिंगदेहरूपी कमलकोशांच्या जो बंदींत पडलेला असतो, तो गुरुकृपेच्या सूर्योदयाबरोबर मुक्त होतो. अनेक योनींतून येतांना प्राप्त झालेल्या शरीरांत कोंडलेला आत्मा, आत्मज्ञान झाल्यावर मोक्ष पावतो;

त्या प्राण्याला जन्ममरणाच्या फेऱ्यांत पुनरपि सांपडावें लागत नाहीं. **लिंगदेह**—शरीर. **बंदीं वेचतेया**—बंदींत क्षीण होणारा, दुःख पावणारा. **मोक्षु उदैला होये**—मोक्ष प्राप्त होतो. **चिद्भ्रमर**—जीवचैतन्यरूप भ्रमर. **ओ.** ५—येथे दुसरा एक कविसंकेत वर्णिला आहे. चक्रवाकाचें जोडपें परस्परावर अत्यंत अनुरक्त असतें. पण रात्र होतांच तीं एकमेकांना दिसत नाहींत, व त्यामुळें नर मादीसाठीं व मादी नरासाठीं रात्रभर आक्रोश करीत असते. सूर्योदय होतांच त्या उभयतांची गांठ पडते. हें रूपक पुढें चालविलें आहे. " भेदरूपी नदीच्या दोन्ही तीरावर बोधरूपी चक्रवाक व बुद्धिरूपी चक्रवाकी ही शद्वाच्या दुःखोत्कटतेनें विरहवेडीं होऊन ओरडत असतात. " जीवदशेंत बुद्धिरूपी चक्रवाकी व बोधरूपी चक्रवाक यांच्यामध्यें द्वैताची नदी आडवी आलेली असते, त्यामुळें त्यांची परस्परास भेट होत नाहीं. अज्ञानावस्थेंत शाब्दिक जंजाळांत माणूस गुरफटलेला असतो, व सर्वत्र द्वैत माजलेलेंच त्याला दिसतें. आत्मज्ञान किंवा गुरुकृपारूपी सूर्य उगवतांच वरील सर्व अडचणी दूर होऊन बुद्धीला खरा आत्मबोध प्राप्त होतो. **आसकडी**—या शब्दाचा अर्थ आसकड—अडचणीची जागा, दुर्गम ठिकाण, असा रा. माडगांवकरांनीं दिला आहे. पण महानुभावी कवि नरेंद्राच्या रुक्मिणीस्वयंवरांत तो शब्द ' इच्छेच्या सीमेनें ' म्हणजे ' उत्कटतेनें ' या आर्थी आला असल्यामुळें, येथे, ' दुःखोत्कटतेनें ' असा लाक्षणिक अर्थ घ्यावा. पहा—" देवी ! तुझी देती आसकडेः धरी कल्पतरू कामधेनु बापुडेः नरेंद्र—रुक्मि. ३५५. **भेद इ.**—भेदरूपी नदीच्या दोन्ही तीरावर. बुद्धि व बोध यांच्यामध्यें ही द्वैताची नदी असते. **अरडाते**—आक्रंदन करतात. ' अरडाते '—असा पाठ डॉ. हर्षे घेत असून त्याचा अर्थ ते ' अडचणीच्या ठिकाणीं ' असा करतात—पहा—साहित्य पत्रिका —अंक ७८. **विरहवेडीं**—परस्पराच्या विरहानें वेडी झालेली. **ओ ६.** अशा वियुक्त झालेल्या चक्रवाकाच्या मिथुनाला एकत्र भेटीचें समाधान प्राप्त करून देणारा, ज्ञानरूपी आकाशभवनाचा दिवा म्हणजेच सूर्य. गुरुकृपा किंवा आत्मज्ञानरूपी सूर्योदय होतांच, बुद्धि व बोध यांची एकत्र भेट होऊन त्यांना समाधान प्राप्त होतें. आत्मज्ञानानें

अथवा गुरुकृपेनें बुद्धीला खरा आत्मबोध प्राप्त होतो व प्राण्याला मोक्षसमाधान प्राप्त होतें. " याचकाचें मिथुन " या राजवाड्यांच्या पाठापेक्षां ' चक्रवाकांचें मिथुन ' हा माडगांवकरांचा पाठ मागील ओवींच्या संदर्भानें सुसंगत असून चांगलाही आहे. **सामरस्य** —ऐक्य. **चिद्गगनभवनदिवा**—ज्ञानरूपी आकाशांतील सूर्य. **ओ. ७.**—ज्या सूर्याचा पहाटे उदय होतांच भेदरूपी चोरवेळ नष्ट होते, व जीवरूपी प्रवासी आत्मानुभवाच्या वाटेनें बिनधोक जाऊं लागतात. आत्मज्ञान होतांच द्वैत नाहींसें होऊन, मुमुक्षु आत्मानुभवाच्या मार्गाला रीतसर लागतो. पहाट झाली म्हणजे चोरांचीं चोरी करण्याची अंधारवेळ जशी जाते, त्याप्रमाणें आत्मज्ञान किंवा गुरुकृपा होताच द्वैत नष्ट होतें. **पहालेनि**— उजाडतांच. पाहाणें = उजाडणें. **चोरवेळ** - चोरांची चोरी करण्याची वेळ. **फिटे**—संपते. **आत्मानुभववाटे**—आत्मानुभवाच्या वाटेनें. **रिगती**—जाती. **पांथिक** -- मार्गस्थ, वाटसरू. **ओ. ८** —ज्या सूर्याच्या विवेकरूपी किरणाच्या स्पर्शानें उन्मेखरूपी सूर्यकांताच्या ठिणग्य पेट घेतात, व त्या संसाराची दाट अरण्यें जाळून टाकतात. आत्मज्ञानानें किंवा गुरुकृपेनें विवेक प्राप्त होऊन, त्या विवेकाने वैराग्यज्ञान उत्पन्न होतें व ते मुमुक्षूला संसारांतून मुक्त करतें. सूर्याच्या किरणाच्या संसर्गानें सूर्य—कांतमण्यांतून अग्नीच्या ठिणग्या पडतात, व त्या मोठ्या वनालाही आग लावण्यास कारणीभूत होतात. येथें गुरूकृपेनें प्राप्त झालेल्या ज्ञानानें विवेक उत्पन्न होऊन, त्या विवेकानें जें वैराग्यज्ञान बाणतें, त्यानें मुमुक्षूची संसाराची इच्छा केव्हांच दग्ध होऊन जाते. **विवेक**—आत्मानात्मविचार. **उन्मेख**— ज्ञान, प्रकाश. पहा— " आतां श्रीकृष्णाचिया कीर्तिचंद्रिका। विकासली उन्मेषकळिका ॥ "—उद्धवगीता—१०. **स्फुलिंगें**—ठिणग्या. **दीपले**—पेट घेतात. **दांगें**—अरण्यें. **ओ. ९** —ज्या गुरुकृपारूप सूर्याचा किरणसमूह प्रखर होऊन, तो स्वरूप माळरानावर स्थिर होतांच, महासिद्धीच्या मृगजळाचा पूर लोटतो. सूर्याच्या प्रखर किरणामुळें माळरानावर मृगजल दिसूं लागतें हें प्रसिद्ध आहे. मृगजळाच्या दृष्टीनें राजवाड्यांच्या ' उबारीं ' या पाठापेक्षां साखऱ्यांचा ' उखरीं ' हा पाठ युक्त आहे. येथें

गुरुकृपेनें साधकाला निर्विकल्प समाधीचा लाभ घडून त्याला आत्म्याचा स्वरूपसाक्षात्कार घडतो, व मग त्याला अणिमालघिमादि अष्टसिद्धि प्राप्त होतात. पण या सिद्धी मृगजळाप्रमाणें फसव्या असतात. त्या साधकाला खऱ्या ब्रह्मप्राप्तीपासून परावृत्त करणाऱ्या असतात. 'प्राणवायुरूप कुंडलिनी शक्ति ही नाभिचक्रांत जागृत होऊन ती प्रथम अग्निरूप होऊन कार्य करुं लागते. त्यामुळें शरीरांतील बहुतेक सर्व भाग खाऊन फस्त करते ( जठराग्नि व धात्वग्नि वाढल्यामुळे ) व नंतर हिला कांहीं खावयास न उरल्यामुळें, हिला तेजाचें रूप येऊन, त्यामुळें सर्व देहाला सुवर्णासारखी कांति चढते. देहाला पुनः तरुणपणची स्थिति येते. अंगावर नवे तुकतुकीत असे केस येतात, जुने दांत जाऊन त्या जागीं हिरकण्यासारखे नवे दांत येतात. या कांतीमुळें त्याचें शरीर जरी इतरासारखेंच वरून दिसतें, तरी पृथिवी व आप तत्त्वें नाहींशीं झाल्यामुळें, तें वायुरूप असतें, व त्याला अष्टसिद्धी प्राप्त होतात.'—पहा—ज्ञानेश्वरीचें शास्त्रीय मंथन. पृ. ५४. **रश्मिपुंजु**—किरणांचा समूह. निबरू कडक, तीव्र. **स्वरूपउखरीं**—आत्मस्वरूपी माळजमीनीवर. हटयोगानें समाधीचा अभ्यास घडून, आत्मा ब्रह्मांडीं स्थिर करतां येतो. मृगजळ माळरानांतच दिसतें त्याप्रमाणें गुरुकृपेनें आत्मा ब्रह्मांडीं नेण्याचा अभ्यास घडला असतां महासिद्धी प्राप्त होतात. **महासिद्धि**—अणिमा महिमा चैव लघिमा गरिमा तथा। प्राप्तिः प्राकाम्य ईशित्वं वशित्वं चाष्टसिद्धयः ॥

**ओ. १८**—योग्याची पुढील स्थिति सांगितली आहे. जो गुरुकृपारूपी सूर्य आत्मबोधाच्या डोक्यावर आल्यावर सोऽहंरूपी मध्यान्हकाळ प्राप्त होतो, व मग आत्मभ्रांतिरूप छाया आपल्याच पायाखालीं जाते. गुरुकृपेनें योग्याला आत्मज्ञान झालें कीं, 'सोऽहं' या मंत्राच्या ज्ञानाचा त्याला प्रत्यय घडतो. ही त्याची दुपार झाली असें समजावयाचें. सूर्य दुपारीं डोक्यावर आला असतां आपलीच सावली आपल्या पायाखालीं दडते. तद्वतच गुरुकृपेचा ज्ञानसूर्य डोक्यावर येऊन 'सोहं' चा प्रत्यय आल्यावर आत्म्याच्या अज्ञानाची छाया आपोआप विरून जाते. 'सोहं' चा प्रत्यय आल्यावर आत्म्यासंबंधीं भ्रम किंवा अज्ञान राहणार कोठून ?

**प्रत्यग्बोध**–आत्मज्ञान. **सोऽहं**–तो आत्मा मी आहे, असें ज्ञान. **आत्मभ्रांति छाया**–आत्म्याच्या भ्रमाची सावली; देहात्मभावाची सावली. **आपणपां**–आपणाजवळ. **ओ. ११**–अशा ऐन दुपारच्या वेळीं जेथें मायारात्रच उरत नाहीं, तेथें विश्वस्वप्नयुक्त अशी अन्यथामतिरूपनिद्रा कोणाला येणार ? गुरुकृपेचा ज्ञानसूर्य मध्यान्हीं आल्यावर व योग्याला आत्मबोध झाल्यावर माया किंवा अज्ञान राहतच नाहीं, आपल्या भोंवतीचें जग खरें आहे, हें अज्ञान टिकतच नाहीं, व ही माया गेल्यावर विश्वाचें हें स्वप्न व आत्म्यासंबंधींचें विपरीत ज्ञानही उरत नाहीं. रात्रीं झोंप व स्वप्नें पडावयाची. पण वरील प्रकारच्या ऐन दुपारच्या वेळीं रात्र कोठली, झोप तरी कोठली व मग स्वप्नांचें नांवच नको. आत्मज्ञानानें मायेचा, भलत्या समजुतींचा निरास होतो, असें वरील रूपकानें स्पष्ट केलें आहे. **अन्यथामतिनिद**––विपरीतज्ञानरुपीं निद्रा. **ओ १२** -म्हणून अशा वेळीं अद्वयबोधरुपीं नगरांत महानंदाच्या दाटणींत किंवा गर्दीत सुखानुभव घेण्याचें किंवा देण्याचें काम देखील मंदावतें. गुरुकृपेनें आत्मज्ञान झाल्यावर सर्वत्र अद्वैताचा प्रत्यय येतो, व मग ब्रह्मानंदाची गर्दी उडाल्यावर या ऐहिक आनंदाची किंवा सुखाची देवघेव थांबते. ब्रह्मानंदापुढें ऐहिक सुखाची किंमत ती काय असणार ? **पाटणीं**–शहरांत. **सुखानुभूतीचो** –ऐहिक सुखानुभवाची **देणीघेणीं**–देवघेव. **मंदावो लागती**—मंदावतात, थंड पडतात. **ओ. १३** किंबहुना याप्रमाणें ज्याच्याकडून मुक्ताचें समाधिरुपी सुदिवसाच्या प्रकाशानें लालन केलें जातें. ज्या गुरुकृपारूप ज्ञानसूर्याकडून मुक्त झालेल्या योग्याला याप्रमाणें समाधिसुख मिळत राहतें. **कैवल्यसुदिस**—कैवल्याचा सुदिवस. पहा – ज्ञानादेव तु कैवल्यम् । समाधिसुखाचा सुप्रसंग. **ओ. १४**—जो सद्गुरुरूपी सूर्य आत्मधामरुपी आकाशाचा राजाच आहे, उदय पावताक्षणीच जो प्रकाशतो, अर्धवट प्रकाशित होत नाहीं, व जो पूर्वपश्चिम दिशांचे व अनुक्रमें उदयअस्ताचें अस्तित्वच नाहींसें करतो. हा सूर्य असा आहे कीं, याच्या सतत प्रकाशानें, पूर्वेला उदय व पश्चिमेला अस्त, असा भेदच राहत नाहीं. सर्वकाळ सारखा प्रकाश. त्यामुळें दिशांचा व उदयास्तमानकालांचा निर्देश करण्याचें कारणच नाहीं. **निजधामव्योम**–

आत्मस्वरुपी आकाश. वर गुरुकृपेवर सूर्याचें रूपक केल्यामुळें, तें पुढें चालावें म्हणून 'निजधामा' वर व्योमाचें रूपक केलें आहे. खे ७०-खेवो क्षणाला, उजेडतांक्षणींच. उदोअस्तूंचा—उदयाचा व अस्ताचा. ओ. १५-जो ( गुरुकृपेचा सूर्य ) दिसण्याबरोबरच न दिसणेंही घालवितो, या दोघांना झांकून जो आपलांच सर्वत्र फैलाव करतो. त्या सूर्योदयासंबंधीं काय बोलायचें ? ती एक निराळी किंवा अवर्णनीय अशी उषाच म्हणावी ! दिसणें व न दिसणें या दोघांनाही झांकून जो आपला म्हणजे आत्मज्ञानाचा सर्वत्र प्रसार करतो. आत्मज्ञानामुळें जगांतील ज्ञान अथवा अज्ञान यांचा लोप होतो असा अर्थ. आत्मज्ञानाच्या प्रकाशानें जगांतील तथाकथित ज्ञानाचा व अज्ञानाचा निरास होतो. सैंघ-पुष्कळ. पघळवी-विस्तार करी. उखा-उषा. आनी-अन्य, निराळ्या प्रकारची. ओ. १६. तो दिवस आणि रात्र यांच्या पलीकडचा ज्ञानमार्तंड, ज्यांच्यावर प्रकाश पाडावयाचा त्या वस्तूं-व्यतिरिक्त असून जो प्रकाशाचा अथवा ज्ञानाचा सुकाळच आहे, त्याला कोण पाहूं शकणार ? गुरुकृपेचा हा ज्ञानसूर्य नित्याच्या दिवसरात्रीच्या पलिकडचा असून, ज्याच्यावर प्रकाश पाडावयाचा तें द्वैतरूप जग, ज्ञानाच्या उदयानें नष्ट झाल्यामुळें, ज्यानें प्रकाशाची अथवा आत्मज्ञानाची रेलचेल केली आहे. पैलकडु—पलीकडचा. प्रकाश्य-दृश्य जगत्, ज्याच्यावर प्रकाश पाडावयाचा तें. सुखाडु-समृद्धि, सुकाळ. प्रकाशाचा-ज्ञानाचा.

ओ. १७. त्या चैतन्यरूपी अथवा ज्ञानरूपी निवृत्ति महाराजांना ज्ञानेश्वर नमन करतात. पुडतपुडती-वारवार. जो इ०-जो चित्सूर्य निवृत्तिनाथ, बाधका बोलाचिया स्तुती येईजताहे ? जो चित्सूर्य, बाधक अथवा उपाधिभूत होणाऱ्या शब्दांच्या स्तुतीच्या आटोक्यांत कसा येणार ? निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे वडील बंधु व तेच त्यांचे गुरु होत. गुरु हे उपाधिरहित असल्यामुळें, शब्दांच्या उपाधीनें बनलेली स्तुति, त्यांचें काय वर्णन करणार ? म्हणून नुसतें नमन करणेंच बरें, असा ज्ञानेश्वरांचा आशय. बाधका-उपाधियुक्त, सदोष. स्तुती येईजताहे-स्तुतींत कसें येणार ?

ओ. १८. वेद हे नेहमी परब्रह्माची स्तुति करणारे आहेत. **म्हणून** येथें चित्सूर्याची स्तुति करावयाची झाल्यास वेदाची योग्यता अंगीं **आणली पाहिजे.** पण ती योग्यता स्तुति करणाऱ्याच्या स्तव्यबुद्धीचा लय झाल्यासच येणें शक्य आहे. जेव्हां स्तुति करणारा, स्तोत्र, व स्तुत्य ही अभिमान-त्रिपुटी नष्ट होईल, तेव्हांच वेदांची योग्यता स्तोत्याला प्राप्त होईल. **मान-योग्यता.** स्तोत्याला वेदाची योग्यता येईल तरच त्यानें केलेल्या **स्तुतींत** चांगुलपणा येईल. **चांगावे**—चांगुलपणा. **स्तुती येईजे** इ० स्तुति चांगुलपणाप्रत जाईल. **स्तव्यबुद्धि**— स्तोता व स्तव्य अशी भेदबुद्धि. ही गेल्याशिवाय वेदाचा मोठेपणा येणार नाहीं. म्हणून अशा स्तुतीच्या भान-गडींत न पडतां, गुरूला नुसता नमस्कार करणेंच श्रेयस्कर, असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें. **ओ. १९.** सर्व वस्तूंचें ज्ञान नष्ट होणें हें ज्याचें जाणणें, मौनाच्या मिठीनेंच ज्याचें वर्णन केलें जातें, व कांहीं न होण्यानेंच ज्याची प्राप्ती होते. जगांतील ज्ञान विज्ञान फोल आहे अशी समजूत झाल्यावरच ज्या ब्रह्म-स्वरूप सद्गुरूचें खरें ज्ञान होतें; कितीही वर्णन केलें, तरी ज्याचें योग्य वर्णन करणे शक्य नाहीं, म्हणून मौन हेंच ज्याचें खरें वर्णन, व कांहींच न होऊं देणें म्हणजे आपल्यांत कोणताही बदल न होऊं देणें, हाच ज्याच्या प्राप्तीचा मार्ग. निर्विकल्प स्थितींत राहण्यानेंच ज्याची प्राप्ति योग्याला शक्य आहे. **नेणिवां**–नेणिवेनें. पहा—'जाणूनि नेणतें करी माझें मन'—तुका-राम. **मौनाचिया मिठिया**–तोंडाला पडलेल्या मौनाच्या मिठीनें परब्रह्माचें वर्णन करतांना वेदांना देखील मौन पडतें. पहा—' नेति नेतीत्यात्मा ' **वानिजे**—वर्णिजे. **कांहींच नहुनि**—कांहींच न होता, आपल्यांत कोणताच बदल न होऊं देतां. **ओ. २०.** ज्या तुझ्या स्तुतीसाठीं वैखरी ही, इतर पश्यंती व मध्यमा या वाणींना परेसहीत पोटांत घालून शेवटीं आपणही विरून जाते. परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी अशा चार वाणी आहेत. सांगण्याचा इत्यर्थ इतकाच कीं, तुझ्या स्तुतीच्या बाबतींत या चार वाणी निरुपयोगी ठरतात. **सूनि**—घालून. पहा–" जवळि येउनि किटकी। भींगुरटी तियेतें डंकी ॥ घरांतु सुनी कवतिकी । लींपौनि सोडी ॥—" उद्धवगीता ५००. **पाठीं**—नंतर, मागून. **ओ. २१.** अशा तुला

अद्वयानंद गुरो ! मी सेवक या नात्यानें शाब्दिक स्तुतीचें लेणें लेववितों. पण हें आपण सहन करावें, असें माझें म्हणणें देखील दोषास्पद आहे. आपण अद्वयानंद असल्यामुळें, द्वैताच्या आश्रयानें मी आपली केलेली शाब्दिक स्तुति म्हणजे मोठीच चूक आहे, व त्यांतही ती पुनः सहन करा असें म्हणणें म्हणजे दुसरी मोठी चूक आहे. **उपसाहावें**—सहन करावें. **उणें**—दोष. **ओ २२.** पण आपल्याकडून ही चूक कां झाली, त्याचें कारण ज्ञानेश्वर दृष्टांतानें सांगतात. एखाद्या भिकाऱ्यानें अमृताचा समुद्र पहावा, व मग त्याचें योग्य स्वागत कसें करावें याचा विसर पडल्यामुळें, त्यानें त्या समुद्राला भाजीपाल्यांचा पाहुणेर करावा, तशीच गत माझी झाली आहे. मला देखील तुमची स्तुति योग्यप्रकारें कशी करावी हें न कळल्यामुळेंच मी शाब्दिक स्तुतीचा कसा तरी अवलंब केला. **शाकांचा**—भाजीपाल्याचा. **ओ. २३.** अशावेळीं त्या रंकानें पुढें केलेला भाजीपाल्याचा पाहुणेरच त्या अमृतसमुद्रानें गोड करुन घेतला पाहिजे. यांत त्या रंकाचा हर्षातिरेकाचा भाव लक्षांत घेतला पाहिजे. अथवा एखादा, काडवातीनें सूर्याला ओवाळीत असतां, त्याची भक्तीच लक्षांत घेतली पाहिजे. त्याप्रमाणें गुरुनें आपल्या शाब्दिक स्तुतीकडे लक्ष न देतां आपल्या अंत:करणांतील गुरुभक्तीकडेच लक्ष द्यावें असें ज्ञानेश्वरांचें म्हणणें. **किरु**—किर—किल—निश्चयानें. **दिव्यतेजा**—सूर्य. **हाथिवा**—हातिवा—काडवातीनें. **उजळणें**—ओवाळणें. **पावी**—पहावी. **ओ. २४.** लहान मुलाला उचित किंवा अनुचित कृत्य जर कळलें तर मग बालपण तें काय ? पण त्याचें कृत्य खरेंच किंवा योग्य मानून त्याची आई संतोष पावते. तद्वतच माझें स्तुतीचें कृत्य अयोग्य असलें, तरी तें आईप्रमाणें गोड मानून घेतलें पाहिजे अशी ज्ञानेश्वरांची आपल्या गुरूस विनवणी. **कें**—कोठें. **साचचि**—तें कृत्य योग्यच म्हणून. **येरी मायी**—त्याची आई. **ओ. २५.** पुनः असें कीं, गांवातल्या घाणीनें भरलेलें पाणी, गंगेच्या पाण्यावर पाय देत वर आलें, किंवा त्याला अनुसरलें तर गंगानदी त्या पाण्याला मागें सर असें म्हणते काय ? गंगा जशी त्या घाण पाण्याला आपल्यांत सामवून घेते, तद्वतच आपण माझ्या शाब्दिक स्तुतीला आपल्यांत सामावून घ्या असा अर्थ. **गंगेच्या समवृत्तीचा**

दृष्टांत ज्ञानेश्वरांनीं अन्यत्र ठिकठिकाणीं दिला आहे. **गांवरस**—गांवांतलें घाणेरडें पाणी. पहा—सव्यें मिनलिया महानदीसी । अपसव्यें आल्या गांवरसासीं । गंगा दोहींतेंही सरिसी । गुणदोषासी उडवूनि ॥ एकनाथी भागवत–११।८६३. पहा—गांवींचें होतें लेंडगोळ । गंगेसि मिळतां गंगाजळ ॥ व्यंक. स्तोत्र. **पाये देत**—तुडवीत. **वरि आलें**—अंगावर आलें, येऊन मिसळलें. **परतें सर**–मागें सर.

**ओ. २६.** येथें पौराणिक दृष्टांत घेतला आहे. असें पहा कीं, भृगुऋषीनें श्रीविष्णूच्या उरावर लाथ मारली, तो अपराध काय लहान सहान ? पण तें भृगूचें कृत्य गोड मानून श्रीविष्णु त्याच्या मोठेपणावर खूष झाले ना ? त्याप्रमाणेंच माझ्या शाब्दिक स्तुतीचा अतिप्रसंग आपण गोड मानून सहन करावा अशीं ज्ञानेश्वर या दृष्टांतानें विनंति करतात. **अपकारु**—अपराध. **उपचारु**—आदर. **गुरुत्वासी**–भृगूच्या ब्राह्मण्याच्या महत्वास. **ओ २७.** किंवा रात्रीं अंधारानें भरलेलें आकाश सकाळीं सूर्यापुढें येतांच, त्यानें त्याला कधीं मागें सर असें म्हटलें आहे काय, अंधारानें भरलेल्या आकाशाचा सूर्य जसा स्वीकार करतो, तद्वतच तुम्हीं माझ्या सदोष स्तुतीचा स्वीकार करावा. **खतैलें**–लिप्त झालेलें. **दिवसनाथ**—सूर्य. **ओ. २८.** त्याचप्रमाणें भेदबुद्धीची तागडी करून सूर्याच्या उपमेच्या पारड्यांत मी तुमची तुलना केली, ती तुम्हीं एक वेळ सहन करावी. भेदातीत अशा सद्गुरूस सूर्याची उपमा देऊन जो भेदाचा संबंध लावला, त्याबद्दल ज्ञानेश्वर क्षमा मागतात. **सूर्यश्लेष**–सूर्याची उपमा. **कांटाळें**—पारडें. **ओ. २९.** आतां मी हा अपराध आजच केला असें नसून प्राचीन मुनीनीं देखील ब्रह्मरूप अशा तुम्हांला ध्यानाच्या डोळ्यानें पाहिलेंच आहे, व वेदाच्या वाणीनें तुमचें स्तवन केलेंच आहे. त्याच्या अपराधाप्रमाणेंच माझा अपराध असल्यामुळें, आपण तो सहन करा असें ज्ञानेश्वरांचें सांगणें. ज्ञानेश्वर आपल्या गुरूंस परब्रह्मच समजत असल्यानें, परब्रह्माचें पूर्वी मुनीनीं केलेलें ध्यान अथवा वेदांनीं केलेली त्याची स्तुति, ती गुरूचीच होय असें ते समजतात. मुनींना अथवा वेदांना

जशी तुम्हीं क्षमा केली तशीच मला करावी. **वानिलासी—वर्णिलासी. ओ. ३०.** पण मी तुमच्या गुणावर लुब्ध झालों असल्यामुळें, माझ्याकडून या बाबतींत घडत असलेल्या अपराधाकडे मी लक्षही देत नाहीं. कांहीं करीन पण अर्धसंतुष्ट असा मी या तुमच्या स्तुतीच्या पानावरून उठणार नाहीं. **लांचावला**-सवकलेला. **अर्धधणी**-अर्धसंतुष्ट, अर्धवट तृप्त. **ओ. ३१.** मी गीतेच्या नांवानें तुमचे प्रसादामृत वर्णन करूं लागलों असतां, तें दुप्पट बळावतें. दैवानें मी दैववान् झालों आहे. **पसायामृत**-प्रसादामृत. गीता हें तुमचेंच प्रसादामृत आहे. **सुहावें**-आवडीनें. **दुणेन**-दुपटीनें **थांवें**-बळावतें. **दैवलें**-दैवणें=दैववान् होणें. **ओ. ३२.** महाराज ! माझ्या वाणीनें सत्यभाषणाचें जे तप अनंत जन्मीं केलें, त्याचेंच फळ म्हणजे हें गीतारूप महाद्वीप मला लाभलें. माझी वाचा सत्यवादाच्या तपाचें फळरूपीं महाद्वीप पातली, पावली. **महाद्वीप**—फल मिळण्याचें स्थल, गीतारूप निरूपणाचें स्थान. माझ्याकडून गीतेचें निरूपण होणें हें पूर्वपुण्याईचेंच फल होय, असें ज्ञानेश्वरांना सांगावयाचें आहे. **ओ. ३३**—जी मी आतापर्यंत पुण्याई केली आहे, तिनें तुमच्या गुणवर्णनाचें फळ देऊन, ती माझी उतराई झाली. माझ्या पूर्वजन्मींच्या असाधारण पुण्याईनेंच तुमचें गुणवर्णन करण्याचें भाग्य मला लाभलें.

**ओ. ३४.** महाराज! देहसंबंधरूपी अरण्यांत व जन्ममरणरूपीं गांवांत मी सांपडलों असतां, ती माझी सर्व पीडा आज संपली. जन्ममरणाच्या फेऱ्यांतून माझी सुटका होऊन आपल्या कृपेनें मला मोक्ष प्राप्त झाला. **आडवीं**-अटवी=अरण्य. **आंतुडलेया**--सांपडलों असतां. पहा—तया केवि आंतुडे मोसु । तया निरूपणाचा?—उद्धवगीता ३९. **अवदशा**—अवदसा, पीडा. **ओ. ३५.** जीं ‘ गीता ’ या नांवानें प्रसिद्ध आहे, व जी अविद्येला म्हणजे अज्ञानाला जिंकून बलवती झाली आहे, ती तुझी कीर्तीच आम्हांला वर्णन करण्याजोगी झाली आहे. गीता म्हणजे दुसरें कांहीं नसून तुझी कीर्तीच असें ज्ञानेश्वरांचें तात्पर्य. **नावाणिगी**-नामांकित, प्रसिद्ध. पहा—“ नावनिगेया वक्तेयासी । नुमानेचि देवाचिया गुणांची रासी । ते काई मववे मनुस्यासीं । येकें मुखें ? ”— नरेंद्र रु. स्वं.३२.

**जिणौनि**—जिंकून. **दादुगी**—बलाढ्य. **आम्हां जोगी**—आमच्या सारख्यास वर्णावयास योग्य. **ओ. ३६.** यालाच दृष्टांत देऊन सांगतात. असें पहा कीं, निर्धन मनुष्याच्या घरीं अकस्मात् लक्ष्मी येऊन बसली, तर त्या माणसाला निर्धन असें म्हणतां येईल काय ? तसेंच गीतारूपी तुझी कीर्ति जर मी वर्णन केली तर मला अज्ञानी कोण म्हणणार, असा ज्ञानेश्वरांचा आशय. **वानवसें**--अकस्मात्. **ओ. ३७.** किंवा अंधकाराच्या भेटीला जर दैवयोगानें सूर्य आला, तर तो अंधकारच जगाला प्रकाश देणारा होणार नाहीं काय ? **ओ. ३८.** ज्या देवाची एवढी थोरवी कीं, त्याच्यापुढें हें जग परमाणू एवढें देखील न दिसावें ! तो भक्ताशीं समसाम्यभावानें वागणार नाहीं कां ? **सरोभरी**—समसाम्यभावाचा. पहा—

तैसे तिये ईश्वरी। आंगोळी नुभेचि दुसरी। किंबहुना सरोभरी। श्रीशीवेशीचि ॥ अमृता०—१०।२०. ज्या देवाचें एवढें सामर्थ्य तो भक्तासाठीं एवढेंहीं करणार नाहीं काय ? अर्थात् करील. **ओ. ३९.** त्याप्रमाणें मी गीतेवर व्याख्यान देणें म्हणजे आकाशाच्या फुलांचा वास घेण्यासारखेंच अघटित होय. पण समर्थ अशा तुम्हीं, ही माझी गीताप्रवचनाची इच्छा पूर्ण केली पाहिजे. **वाखाणणें**—व्याख्यान करणें. **खपुष्पाची**—आकाशपुष्पाची. सशाचें शिंग अथवा आकाशाचें फूल, या अघटित घटना होत. पहा—शशशृंगधनुर्धरः खपुष्पकृतशेखरः। भर्तृहरीनेंही " प्रयत्नें वाळूचे कण रगडितां तेलहि गळे । तृषार्ताची तृष्णा मृगजळ पिऊनीहि वितळे । शशाचेंही लाधे विपिन फिरतां शृंगहि जरी। परंतू मूर्खाचें हृदय धरवेना क्षणभरी ॥ " अशा अशक्यप्राय घटना सांगितल्या आहेतच. आपण गीतेवर व्याख्यान करणें म्हणजे केवढी अशक्य गोष्ट ! एवढेंच ज्ञानेश्वरांना येथें विनयानें सुचवावयाचें आहे. पण आपल्या गुरूच्या कृपेनें ही अशक्य गोष्टही आपण करूं असा त्यांना आत्मविश्वास आहे. **तुरंबणी**-वास घेणें. **सिरियाणी**—आवड, इच्छा. **ओ. ४०**—येथें गुरुचें स्तवन समाप्त झालें आहे. **ओ. ४१.** येथून मागील पंधराव्या अध्यायांत भगवंतांनीं काय सांगितलें, त्याचा निर्देश करतात. **पन्हरावां**—पंधराव्या अध्यायांत. **शास्त्र**-

**सिद्धांत**—वेदांतशास्त्राचा सिद्धांत. **आवघा**— सर्व. **उगाणिला**— उगाणणें— झाडून एकंदर सांगणें.

**ओ. ४२.** ज्या प्रमाणें एकाद्या उत्तम वैद्यानें रोग्याच्या अंगांत मुरलेल्या रोगाची चिकित्सा करावी, तद्वत् भगवंतांनीं पंधराव्या अध्यायांत वृक्षाच्या रूपकानें अथवा परिभाषेनें प्रत्येक प्राणिमात्राच्या मागें लागलेल्या संसाराच्या उपाधीचें स्वरूप स्पष्ट केलें आहे. भगवंतानीं " ऊर्ध्वमूलमधःशाखं अश्वत्थं प्राहुरव्ययम् । " असें संसारावर वृक्षाचें रूपक केल्याचें प्रसिद्धच आहे. **परिभाषा**--रीति, प्रकार. ( तृ. ) **अशेषा उपाधि-इ०**—संसाररूपी उपाधीचें सर्वांगीण वर्णन केलें आहे. **रूप करणें**—वर्णन करणें. पहा—" निसादाचिए श्रुति वरी तारी । जयाचिया सादाची दिसे थोरी । तो वेदघोषु रूप करी । सुधेयासीं ॥-नरेंद्र, रुक्मिणीस्वयंवर-१८० **आंगलीना**—अंगात गुप्त असलेलें. **ओ. ४३.** आणि अविनाशी असा जो शरीरांतील जीवात्मा, तो ' पुरुष ' या शब्दानें स्पष्ट केला, व त्याचें तें वर्णन म्हणजेच उपाधीनें झांकलेल्या चैतन्याचें वर्णन होय. **कूटस्थु**-शरीरांत असणारा आत्मा. **अक्षरु**—अविनाशी. **उपहिता**—उपाधियुक्त. पंधराव्या अध्यायांत कूटस्थ अविनाशी जो आत्मा, तो पुरुषाकार कसा होतो, म्हणजे चैतन्य उपाधियुक्त होऊन निराकार तेंच साकार कसें होतें, हें सांगितलें आहे. " द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एवच । क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ " या पंधराव्या अध्यायांतील श्लोकाचाच येथें ज्ञानेश्वरांनीं अनुवाद केला आहे. **ओ. ४४.** त्यानंतर आत्मतत्व जें परब्रह्म तें देखील उत्तम पुरुष या शब्दाच्या द्वारां उत्तम रितीनें स्पष्ट केलें. ही ओंवी देखील; " उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः । यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्ययमीश्वरः ॥ " या श्लोकाचाच अनुवाद आहे. **शब्दाचें करूनि मिष**-शब्दाच्या मिषानें, निमित्तानें. **आत्मतत्व**-परमात्मा, परब्रह्म.

**ओ. ४५.** आत्मप्राप्तीचें अगदीं अंतरंगांतलें पण अचूक असें जें साधन तें ज्ञान भगवंतांनीं पंधराव्या अध्यायांत सांगितलें. **आत्मविषयीं**–आत्म्यासंबंधीं, आत्मलाभाचें. **आंतुवट**–अंतरंगांतलें. **आंगदट**–बळकट. **चावळला**—बोलून गेला. **ज्ञान**—पुरुषोत्तमयोगाचें सांगितलेलें रहस्य. **ओ.** ४६. म्हणून आतां सोळाव्या अध्यायांत निरूपण करण्यासारखें कांहींच राहिलें नाहीं. गीतेचा प्रतिपाद्य विषय पंधराव्या अध्यायांतच पूर्ण झाला. आतां गुरुशिष्यांच्या परस्पर स्नेहामुळेंच ती गोष्ट पुन: सांगावी लागत आहे. **लाहणा**—प्राप्त होणारा, लाभणारा. **ओ.** ४७. याप्रमाणें भगवंतांनीं अर्जुनाला पुष्कळ समजून सांगितलें. भगवंतांनीं पंधराव्या अध्यायांत अर्जुनाला सर्व ज्ञान सांगून टाकलें असल्यामुळें, त्याच्यासाठीं आणखी सोळाव्या अध्यायाची योजना करण्याची जरूरी नव्हती. पण मुमुक्षूसाठीं भगवंतांना तशीं योजना करणें भाग पडलें. **विंशीं**—या विषयीं. **तेयातें**–अर्जुनातें. **किर**—निश्चयानें. **बुझावले**—समजावलें. **ओ. ४८.** हा पंधराव्या अध्यायांतील १९ व्या श्लोकाचा अनुवाद आहे–"यो मामेवम-संमूढो जानाति पुरुषोत्तमम् । स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥" अशा मला पुरुषोत्तमाला जो मर्मज्ञ, ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन भेटतो, तो सर्वज्ञ असून त्यानेंच भक्तीची सीमा गांठली. **सुवर्मा**—अत्यंत मार्मिक.

**ओ.** ४९. असें पंधराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत जें त्रैलोक्यनायक भगवंतांनीं सांगितलें, तेथें बहुतेक ज्ञानाचेंच वर्णन त्यांनीं मोठ्या संतोषानें केलें आहे. **तोषें**—संतोषानें. **ओ** ५०– प्रपंचाचा किंवा संसाराचा घोंट घेऊन, पाहता पाहतांच जो द्रष्टा किंवा ज्ञानी होतो, म्हणजे जो आपणाला ब्रह्मसाक्षात्कार करून घेतो, तो जीवाला म्हणजे आत्म्याला आनंदसाम्राज्याचा पट्टाभिषेक करतो. संसाराचा संन्यास करुन ब्रह्मसाक्षात्कार होतांच जो ब्रह्मांत मिळून जातो, त्यालाच ब्रह्मानंद प्राप्त होतो. **घोट घेणे**–त्याग करणें, गिळणें. **देखत देखतां चि**—पाहतां पाहतां. **द्रष्टु**–द्रष्टा,

आत्मसाक्षात्कारी, ज्ञानी. **पाटु बांधिजे**—पट्टाभिषेक करतो. **ओ. ५१.** असा आत्मप्राप्तीचा दुसरा उपायच नाहीं, म्हणून या उपायानंतर सर्व ज्ञानाचा राजा हो, असें भगवान् अर्जुनास म्हणाले. **पुडुतीं**–नंतर. **ओ.५२.** पूर्वी जे आत्मजिज्ञासु होऊन गेले, त्यानींही स्वसंतोषानें या ज्ञानावरुन आपल्या प्राणांची कुरवंडी केली आहे. मग अशा ज्ञानप्राप्तीसाठीं तूंही आटोकाट प्रयत्न करावास, असें भगवंतांचें अर्जुनास सांगणें. **आत्म-जिज्ञासु**—ब्रह्मजिज्ञासु.

**ओ.** ५३. आतां ज्याबद्दल आवड उत्पन्न होते, त्याच क्षणीं ती पुढें पुढें पाऊल टाकूं लागतें, व त्यालाच प्रेम असें म्हणतात. पुरुषोत्तम-योगरुपी ज्ञानाबद्दल तुला आवड उत्पन्न झाली आहे. त्या आवडीनें बरीच मजलही मारली आहे. म्हणजे त्या ज्ञानाबद्दल तुला प्रेम आहे असें भगवं-तांचें अर्जुनास सांगणें. **ओ.** ५४. म्हणून ज्या जिज्ञासूंची या ज्ञानाबद्दल अजून खरी प्रीती उत्पन्न झाली नव्हती, त्यांना हें ज्ञान कसें मिळवावें व मिळाल्यावर तें कसें टिकवावें हा विचार पडाला. **निकी**—चांगली. अर्थाच्या व यमकाच्या दृष्टीनें 'निती' यापेक्षां 'नीकी' हा पाठच ग्राह्य आहे. **योगक्षेम**—योग = प्राप्ति व क्षेम = जतन करणें. **ज्ञानविखीं**—ज्ञानाविषयीं. **स्फुरला**—उत्स्फूर्त झाला. **ओ.** ५५. म्हणून तेंच आत्म-ज्ञान आपणांस कसें प्राप्त होईल व तें प्राप्त झालें असतां, त्याचें चांगलें जतन कसें होईल, हाच जिज्ञासूला विचार पडतो. **वाडजतन**—मोठें जतन, फार तत्परता. **निफजे**—होई. पंधराव्या अध्यायांत खरें ज्ञान सांगितल्यानंतर सोळाव्या अध्यायांत येणाऱ्या विषयाची जरुरी कशी आहे, तें या व पुढील दोन ओंव्यांत सांगतात.

**ओ.** ५६. जेणेंकरुन ज्ञान उत्पन्नच होत नाहीं, उत्पन्न झालें असतां जें आडमार्गाला लागतें, तें ज्ञान वाईट कां चांगलें हें समजावें म्हणून, (त्यांनीं विचार आरंभिला). **अव्हाटा**–आडमार्ग. **वोखटे**–वाईट. **ओ.५७.**

मग ज्ञानाला विरुद्ध असणाऱ्या गोष्टीं जाणूं, त्यांना वाटेस लावण्याचा विचार करूं, व सर्वप्रकारें ज्ञानाला हितकारक व पोषक तेंच करूं. **वीरु**—विरुद्ध. **वाट-वाहाणी करणें**—वाटेस लावणें, वाटेंतून घालविणें. **ओ. ५८.** याप्रमाणें तुम्हीं सर्व जिज्ञासूंनीं ज्ञानासंबंधीं जी आस्था मनांत धरली, ती पुरविण्या-साठींच भगवान् सोळाव्या अध्यायांतील विषय सांगणार आहेत. **ओ. ५९.** ज्या संपत्तीमुळें ज्ञानाचा पुनर्जन्म होऊन आत्मप्राप्तीचा आनंदही वाढतो, ती दैवी संपत्ति मोठ्या महत्वानें भगवंताकडून सांगितली जाईल. **विश्रांति**—आत्मज्ञानाचा आनंद. **पवाडे**—महत्वानें. **ओ ६०.** आणि अज्ञानाला अंकित होऊन जी रागद्वेषांना थारा देते, त्या भयंकर आसुरी संपत्तीचेंही वर्णन केलें जाईल. **कामाकारें**—कामाकार = अंकितपणा. सोळाव्या अध्यायांत कोणत्या विषयांचें विवेचन येणार आहे, तेंच येथें सांगितलें आहे. **ओ. ६१.** सहज रितीनें इष्ट व अनिष्ट घडवून आणणाऱ्या अनुक्रमें या दोन संपत्ती आहेत, असा नवव्या अध्यायांत उपक्रम केलाच होता. **साहाजे**—सहज रीतीनें. **इष्टानिष्टकरणीं**—चांगलें वाईट करण्यांत. **कवतिकिणी**—नवल घडवून आणणाऱ्या. **दोघीं**—दैवी व आसुरी संपत्ती. **नवमाध्यायीं**—गीतेच्या नवव्या अध्यायाच्या १२ व १३ श्लोकांत, दैवासुरसंपत्तींचा विषय आला आहे. पहा—" मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञानविचेतसः । राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः " ॥ १२ ॥ व " महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः । भजंत्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥ " **उभारणी**—मांडणी.

**ओ. ६२.**—येथे नवव्या अध्यायांतच दैवासुरसंपत्तिवर्णनाच्या संधीचा फायदा घ्यावयाचा, पण दुसराच विषय त्यावेळीं पुढें आला. म्हणून भगवान् त्या विषयाचें निरूपण येथें सोळाव्या अध्यायांत करणार आहेत, अशी सोळाव्या अध्यायाची येथे संगति सांगितली आहे. **साउमा**—प्रत्यक्ष. **उवावो घेयावा**—वाव घ्यावा, संधि साधावी. **वोडवला**—प्राप्त झाली,

पुढें आली. पहा–' कीं सत्य चंचुपट ओडवलें शुकानें ' –नलदमयंती स्वयंवराख्यान. पहा– तो वैराग्याचा कांतिउ । किं माहातपाचा वोतिउं । किं निवृत्तिचा थळिउं । वोडवला तो ॥ २५१ ॥ उद्धवगीता–भास्करभट्ट. आनु–अन्य, दुसरा. प्रस्तावो–प्रसंग, विषय. नवव्या अध्यायांत भक्तीचें व ज्ञानयज्ञाचें निरूपण पुढ आल्यामुळें, देवासुरसंपत्तीचा विषय राहून गेला. ओ. ६३. त्या राहून गेलेल्या विषयालाच सोळावा अध्याय असें नांव दिलें आहे. त्याची संगति पाहिली तर मागील नवव्या अध्यायांतलाच विषय पुढें चालू केला आहे. लावणी–संबंध. मागिला वरि– मागच्यावरून पुढें चालू. ओ. ६४. ज्ञानाच्या इ.–ज्ञानाला अनुक्रमें पोषक व मारक. प्रस्तुत ज्ञानाच्या अनुक्रमें हिताहिताच्या दृष्टीनें या दोन संपत्ती सारख्याच महत्वाच्या आहेत. ओ. ६५. जी मुमुक्षूला मोक्षमार्गाला सुरक्षित नेऊन पोंचविणारी, मोहाच्या अंधाऱ्या रात्रीं मार्ग दाखविणारी धर्ममशालच होय, त्या दैवी संपत्तीचें वर्णन अगोदर ऐक, असें भगवान् अर्जुनास सांगतात. बोलावी–पोंचविणारी. धर्मदिवी–जशी धर्मशाला तशीच ही धर्ममशाल. वाटेल त्या मुमुक्षूनें तिचा उपयोग करून घ्यावा.

ओ. ६६. येथें संपत्तीची व्याख्या सांगितली आहे. ज्या ठिकाणीं परस्परांना पोषक असे पुष्कळ पदार्थ एकत्र केले जातात, त्यांनाच संपत्ति असें म्हणतात. एकीं–एकें ठिकाणीं. संपजति–संपद्यंते–एकत्र केले जातात, जमतात. ओ. ६७. येथे ' दैवी ' शब्दाची व्युत्पत्ति सांगितली आहे. देवांना शोभण्यासारखे गुण उत्पन्न करणारी, देवांना योग्य अशा गुणांची उपजीविका म्हणजे परिपोष करणारी, अशी ही आहे, म्हणूनच तिला दैवी संपत्ति म्हणतात. ( श्लोक पहिला ) ओ. ६८. येथून दैवी संपत्तीच्या एकेका गुणाचें निरूपण सुरू होतें. प्रथम ' अभय ' हा गुण वर्णन करतात. धुरेचा–अगदीं पुढचा, पहिला. बैसणा–बसणारा, अग्रस्थानीं

बसणारा. आकर्णी—ऐका. ओ. ६९. महापुरांत घालून घेतलें नाहीं, तर बुडण्याचें भयच राहत नाहीं. अथवा पथ्य धरलें असतां, रोगाला भिण्याचें कारण नाहीं. नेघपे—घेत नाहीं. सियारी—भय. धरीं—पथ्याचा धर अथवा कांस धरली असतां. ओ. ७०. त्याप्रमाणें कोणतेंही कर्म किंवा अकर्म करतेवेळीं जो अहंकाराला उत्पन्नच होऊं देत नाहीं, व अशा रितीनें संसाराचा दरारा किंवा भयच ज्यानें नष्ट केलें आहे. संसाराचें मूळ जें अहंकार तेंच उपटून टाकल्यावर भय कोठलें ? मोहरा—पुढें, समोर. ओ. ७१. अथवा सर्वत्र अद्वैतवृत्तीचा प्रसार केल्यानें, ज्यानें जगच आत्मा असें मानलें आहे. व ज्यानें संसाराचें नांव देशोधडीला लावलें आहे. ( तोच अभय झाला असें मानावयाचें ). देशें दिसें–देशों दिशांना. कदाचित् येथे ' दश दिसें ' असाही पाठ असेल. मग त्याचा अर्थ ' दशदिशांना ' असा होईल. अद्वैत व विश्वात्म वृत्ति झाली असतां कशाचें भय राहणार ? ओ. ७२. यालाच दृष्टांत देतात. पाणी मिटाला जों बुडवूं पाहतें, तों मीठच पाण्यांत सामावून जातें. त्याप्रमाणें आपण सर्व जगाशीं अद्वैत राखलें म्हणजे भय नष्ट होतें. मीठ जसें पाण्याशीं एकरूपता पावतें, तसा आपण समभाव टेवला पाहिजे.

ओ. ७३. अभय हें सर्वज्ञानाचा अभिप्राय किंवा निष्कर्ष आहे. ओ. ७४. यांत ' सत्वशुद्धी ' चें विवरण करतात. जशी राखुंडी जळतही नाही व विझतही नाही, तशीच शुद्ध बुद्धि, संकल्पविकल्पापासून अलिप्त असते. येथें ' वन्हि जैसा ' या राजवाडेपाठाहून ' राखोंडी जेवी ' हा पाठ युक्त आहे. कारण ज्ञानेश्वरांना न जळणाऱ्या व न विझणाऱ्या अशा पदार्थाचा दृष्टांत अभिप्रेत आहे, व ' वन्हीला ' तर, वरील विशेषणें लागू पडत नाहींत. ओ. ७५. अथवा प्रतिपदेला होणारी कलावृद्धि व अमावास्येला संपलेला कलाक्षय यांच्या मधल्या अवस्थेंत चंद्र जसा निर्विकार असतो. पाडिवा इ.—प्रतिपदेला होणारी कलेची वाढ, चंद्र कांहीं मागत नाहीं. अशी संधि म्हणजे कलावृद्धि होण्यापूर्वीचा काळ. अवसा इ.–आमावास्येला, चंद्राचा

कलाक्षय संपल्यानंतरचा काल. **तूटि**–क्षय. **माजी**–या दोन कालामधल्या संधिकालांत. या कालांत चंद्र मूळच्या स्वरूपांत निर्विकार असतो, तें त्याचें शुद्धस्वरूप असतें. **ओ. ७६.** किंवा, पावसाळयानंतर व उन्हाळ्या-पूर्वीचें म्हणजे या दोन ऋतूंमधील कालांत गंगेचें स्वरूप जसें आबाधित असतें. **वार्षिया सांडिली**–वर्षा ऋतूनें सोडलेली अर्थात् पावसाळयानंतरची. **ग्रीष्में इ.**–ग्रीष्म ऋतूनें आपला शोषण्याचा प्रभाव जिच्यावर चालविलेला नाहीं, अशा कालांतील. या मध्यंतरीच्या कालांतील गंगानदीच्या पात्राचें स्वरूप जसें मूळ अबाधित असतें, तसाच शुद्धबुद्धीचा मनुष्य निर्विकार असतो असा अर्थ. **निवडिली**—पसंत केली.

**ओ. ७७.** त्याप्रमाणें संकल्प व विकल्प यांची मनाला लागलेली ओढ सोडून व रज तम या गुणांची मानेवर बसलेली कावड टाकून देऊन, आत्मस्वरूपाची गोडी उपभोगीत असतां शुद्धबुद्धीच जेथें उरते. **निज-धाम**—ब्रह्मपद, आत्मस्वरूप. **ओ. ७८**–आपल्या इंद्रियांनीं अनुकूल अथवा प्रतिकूल असे पदार्थ दाखविले, तरी जो आपल्या मनांत त्यांबद्दल कसलेच कुतूहल उत्पन्न होऊं देत नाहीं. **विस्मो**–विस्मय = आश्चर्य. **ओ. ७९**--एकाद्या पतिव्रतेचा पति गांवास गेला असतां तिला विरहसंताप होतो, व अशावेळीं ती कोणत्याच फायद्यातोट्याकडे लक्ष देत नाहीं. तिची वृत्ति पतीकडे लागलेली असते. **भलतैसा**—कोणताही. सत्व-शुद्धि झालेल्याची वृत्ति देखील अशीच ब्रह्माकार झालेली असते. **ओ. ८०.** आत्मस्वरूपाची गोडी लागल्यामुळें, ज्याची बुद्धि अद्वैत पावली आहे तीच सत्वशुद्धि, असें केशिराक्षसाला मारणारा श्रीकृष्ण म्हणतो. **ओ. ८१.** आतां आत्मलाभ करून घेतांना, ज्ञानयोग व कर्मयोग यापैकीं कोणताही एक जो आपल्या आटोक्यांत असेल त्याचीच जो आसक्ति धरतो. **टाकीं**—आटोक्यांत. **हावें भरे**—आसक्तीनें परिपूर्ण होतो, आसक्ति धरतो. ज्याला आत्मस्वरूपीं लीन व्हावयाचें आहे, तो या दोन योगांपैकीं एकाचा अवलंब करतो.

**ओ. ८२.** निष्कामवृत्तीनें अग्नीमध्यें जशी शेवटची पूर्णाहुति देतात, त्याप्रकारें ज्ञानयोगांत अथवा कर्मयोगांत आपकी चित्तवृत्ति मुरवावी. **चित्तवृत्तीचा त्याग करणें**—चित्तवृत्ति मुरविणें किंवा तिकडे लावणें. **ओ. ८३**--किंवा कुलीन माणसानें आपली मुलगी कुलीन घराण्यांत दिल्यावर ती जशी तेथें स्थिर होते, किंवा लक्ष्मी ज्याप्रमाणें विष्णूच्या ठिकाणीं स्थिरावली आहे, तशीच आपली वृत्तीही वरील योगांपैकी एकांत त्यानें स्थिर केली पाहिजे. मूळ श्लोकांतच 'ज्ञानयोगव्यवस्थिति' असे शब्द असल्यामुळें, राजवाड्यांच्या ' संयमाग्नीचा ' या पाठापेक्षां ' जे योगज्ञानीचया ' हा साखरेपाठ युक्त वाटतो. **ओ. ८४.** आपणांस सर्वस्वी विकून घेऊन जे ज्ञानयोग किंवा कर्मयोग यांपैकीं एकाचें वतनदार होणें, त्यालाच श्रीकृष्ण तिसरा ' ज्ञान ' गुण म्हणतात. **विकलेपणें** – सर्वस्वी स्वाधीन होऊन. **वृत्तिका होणें**— वतनदार होणें. **ओ. ८५.** येथून चवथ्या ' दान ' गुणाचें वर्णन करतात. आतां कायावाचामनेंकरून व यथाशक्ति धनानें, पीडित झालेल्याची जो प्रतारणा न करतां, त्याची योग्य ती संभावना करतो तेंच दान होय. **परि जालेया इ.**–आर्त अथवा पीडित झालेल्यास.

**ओ. ८६**–हे अर्जुना ! वृक्ष ज्याप्रमाणें आपल्या फुलांच्या, फळांच्या छायेच्या, मुळांच्या व पानाच्या बाबतींत आपल्याजवळ आलेल्या वाटसराची फसवणूक करीत नाहीं. **वाटेचा**–वाटसरूस. **न चुके**--फसवीत नाहीं. **आलिया**—जवळ आलेल्यास. **ओ. ८७**--त्याप्रमाणें मनापासून धनापर्यंत आपल्याजवळ असेल त्या साधनानें श्रांत झालेल्या माणसाच्या मनाला संतोष होईल अशा रितीनें जो अडचणींत उपयोगी पडतो. येथें ' मानौनि ' या पाठाहून ' मनौनि ' हा पाठच मूळचा दिसतो. कारण धनापर्यंत म्हटल्या-वर कशापासून या पदाची अपेक्षा राहते, ती ' मनापासून ' यानें पूर्ण होते. **वेन्ही**—पर्यंत. **विद्यमाने** –आपल्याजवळच्या वस्तूंनीं. **अवसरीं**–अडच-णींत. **मनोहारी**–चांगल्यारितीनें ( क्रि. वि. ). **ओ. ८८**--**मोक्षनिधानाचें**

इ. –जें मोक्षरूपीं भूमिगत द्रव्य दिसण्याचें अंजनच आहे. विशिष्ट अंजन डोळयांत घातलें असतां, भूमिगत द्रव्य दिसतें अशी समजूत आहे. येथें दानरूपीं अंजनानें मोक्षरूपीं भूमिगत द्रव्य हातांस लागतें, दानानें मोक्ष मिळतो असा अर्थ. ओ. ८९. आतां 'दमा' चें लक्षण सांगतात. ज्याप्रमाणें तरवार धारण करणारा शत्रूला तोडतो. तद्वत् विषय व इंद्रियें यांच्या होत असलेल्या संयोगाचा जो तत्क्षणींच वियोग करतो. आपल्या इंद्रियांना विषयाकडे जाऊंच देत नाहीं. मिळणी–संयोग. उदैजत--होत असतानांच. विभुटणी–वियोग. सूये–घालतो. पारकेया–शत्रूस. ओ. ९९--याप्रमाणें इंद्रियद्वारा येणारा अनेक विषयांचा वारा जो आपणास लागूंच देत नाहीं, व इंद्रियांना संयमानें बांधून जो प्रत्याहाराच्या ताब्यांत देतो. यम, नियम, प्रत्याहार ही अष्टांगयोगाचीं निरनिराळीं अंगें आहेत. आपल्या इंद्रियांना निरनिराळ्या विषयांच्या समूहापासून संयमानें आवरून धरून त्यांच्याकडून हटयोगाची प्रत्याहारासारखी इतर अंगें जो साधून घेतो. वोपिजती–दिलीं जातात. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान, व समाधि ही हटयोगाची आठ अंगें आहेत. प्रत्याहार–स्वस्वविषयासंप्रयोगे चित्तस्वरुपानुकार इवेंद्रियाणाम् ।--योगसूत्र ५४. पहा—' मग प्रत्याहाराचा आधाडा जो बुद्धिचेयाही पायां निसरडा । जेथ हटिये सांडित होडा । कडेलग ॥ '--ज्ञानेश्वरी ६।५६.

ओ. ९१. चित्ताच्या आंतल्या अंतरंगापर्यंत प्रवृत्ति मागें दवडावी, व मग दशेंद्रियांच्या द्वारांत वैराग्याचा अग्नि पेटवून दिला असतां, ती बाहेर येऊन सैरावरा पळणार नाहीं. किल्ल्याच्या बाहेरच्या सर्व द्वारांना आग पेटवून दिली म्हणजे ज्याप्रमाणें आंतला शत्रू बाहेर पडणार नाहीं, त्याप्रमाणें दशेंद्रियें वैराग्यानें रोखून धरलीं असतां, एकदां आंत मुरडलेली वृत्ति विषयांकडे सैरावैरा धांवणार नाहीं. सुइजे—घालिजे. ओ. ९२. प्राणायामापेक्षांही अधिक खडतर अशी जीं देहदंडाची इतर व्रतें, तीं आच-

रत असतां ज्याला समाधान नाहीं. आणखी खडतर व्रतें करावी अशी ज्याला तीव्र इच्छा आहे. **बहुवसें**—पुष्कळ. पहा—" गावोंगावीं उदकें बहुवसें। परि नाहीं वोधु गगनगंगेचा ॥ —उद्धवगीता " ५१७. **कृच्छ्रादि**—पहिलें दिवशीं एकवार भोजन, दुसरें दिवशीं सायंकाळीं भोजन, तिसरें दिवशीं याचना न करतां प्राप्त होईल तें खाऊन राहणें, व चवथे दिवशीं उपोषण, याप्रमाणें तीनवार केल्यानें बारा दिवसाचें जें व्रत तें कृच्छ्र. **खरपुसें**-प्रखर, कडक. **उसंतिता**—आचरीत असतां. **आराणुक**—समाधान. पहा—" मानें पाचारितां नव्हे आराणुक। ऐसे येती लोक प्रीतीसाठी—" तुकाराम. **ओ. ९३.** या पुढें 'यज्ञाचा' अर्थ सांगतात. "तरी ब्राह्मणापासून प्रारंभ करून, स्त्रीशूद्रादि पालीकडीच्या सीमेपर्यंत मध्यें असणाऱ्या सर्वांनीं आपापल्या अधिकाराप्रमाणें आपापल्या देवतांचें पूजन करावें." **मेरे** = सीमा, कड. **ओ. ९४. यथागमविधि**—शास्त्रोक्तपद्धतीनें.

**ओ. ९६.** ब्राह्मण आपली नित्याची षट्कर्में करीत असतां, शूद्रानें त्याला वदन करणें, यांत त्या दोघांनाही यज्ञाचें फल सारखेंच प्राप्त होतें. **सरोभरी**-बरोबरीनें. **निफजे**—उत्पन्न होतो, प्राप्त होतो. **यागु**—यज्ञ. **ओ. ९७.** अधिकारपरत्वें यज्ञ सर्वांनींच करावयाचा आहे, पण विषयरूपी फलाशेस मध्यें येऊं देऊं नये. **नेघपे**—येऊं देऊं नये. **माजी**—मध्यें. **पर्यालोच**—विचार, अवलोकन. **ओ. ९८**—आणि मी या यज्ञाचा कर्ता आहे, असा अहंभाव देहाच्या द्वारां मनांत तर शिरूं देऊं नयेच. पण इकडे वेदाच्या आज्ञा तर पाळाव्या. वेदविहित कर्में करावीं पण तीं अहंभावविरहित, फलाशा सोडून आचरावीं. **ठावो होइजे**—वेदाज्ञेचें तर आपण स्थान व्हावें. **ओ. ९९.** हाच यज्ञ, मोक्षमार्गाचा जाणता व सोबती होय. **कैवल्यमार्ग**—मोक्षमार्ग.

**ओ. १००**—आतां चेंडू जो भुईवर आपटला जातो, तो भुईला मारण्याकरितां नसून, तो चेंडू आपल्या हातीं पुनः यावा यासाठींच होय.

किंवा शेतांत जरी बी विस्कटलें तरी पुढील पिकावरच पेरणाऱ्याचें लक्ष असतें. ओ. १०१. किंवा ठेवलेली वस्तु दिसावी म्हणूनच कोणी झालें तरी दिव्याचा आदर करतो, किंवा वृक्षाच्या फांद्यांना फळें लागावीं म्हणूनच त्याच्या मुळाला पाणी घातलें जातें. पहा—" गाईल त्याचा गळा आणि शिंपील त्याचा मळा. " ठेविलें–ठेवलेली वस्तु. फळावेया–फळे लागण्या-साठीं. ओ. १०२ फार काय पण आरसा आपणाला स्वतःला पाहण्या-साठींच पुनः पुनः आवडीनें पाहिला जातो. आपणपेंया–आपणा स्वतःला. पुडुतीं पुडुतीं–पुनः पुनः. बहुवसा–पुष्कळ, मोठ्या. पहा–बहुतां बाइलांतु लक्षुमी रूपस । परि तियेपासौनि हे डोळस । आन चातुर्यें गुणींही बहुवस । रतींपासौनिया ॥ १९३–नरेंद्र– रुक्मिणी स्वयंवर. प्रीती–प्रीतीनें ( तृ ). ओ. १०३. त्याप्रमाणें वेदप्रतिपाद्य असा जो ईश्वर तो इंद्रियगोचर होण्या साठींच वेदांचा नित्य अभ्यास करावयाचा. ओ. १०४. ब्रह्मप्राप्तीसाठीं ब्राह्मणांना वेदांतील ब्रह्मसूत्राचा अधिकार, इतर जातींना देवतास्तोत्राचा व नामजपाचा मात्र अधिकार असा जो भेद येथे केला आहे, तो ज्ञानेश्वर–कालीन चातुर्वर्ण्यपोषक समाजस्थितीचा निदर्शक आहे. ब्रह्मसूत्र–उपनिष-द्वाक्य. आवर्तवणें–पुनः पुनः पढणें (म्हणणें). तत्त्व–परब्रह्म. ओ. १०५. स्वाध्यायाचें विवेचन करतांना ज्ञानेश्वरांनीं तें चार वर्णांच्या अनुरोधानें केलें आहे. स्वाध्यय=अध्ययन. ओ. १०६. येथें 'तप' या शब्दाचें स्पष्टीकरण करतात. आत्मज्ञान झाल्यानंतर सर्वस्वाचा त्याग झाल्यानंतरही साहजिक मरण येईपर्यंत शरीराचें रक्षण करणें. ज्याप्रमाणें वनस्पती फळें देऊनच शुष्क होतात. त्याप्रमाणें आत्मज्ञानाचा प्रसार करीतच देह झिजविणें यालाच भगवान् तप म्हणतात. यावरून ओघानेंच येतें कीं, शरीराला कष्ट देऊन आमरणांत जिवापाड देहदंड करणें, याला तें ' तप ' म्हणत नाहींत. दानें इ०–दान देतांना सर्वस्वाचा त्याग करून तें देणें. येथें ' ज्ञानें सर्वस्व जाणे ' या पाठाहून ' दानें सर्वस्व देणें ' हा पाठच बरोबर आहे. कारण

श्लोकांत ‘ दाना ’चाच संबंध आला असून, ‘ ज्ञाना ’चा उल्लेख नाहीं. **रक्षणें**—शरीराचें रक्षण करणें. **फळोनि**—फळें देऊन.

**ओ. १०७.** किंवा धूप आपणास जाळून घेतो, पण इतरांना सुगंध देतो, सोनें अग्नींत तापविलें असतां त्याच्या प्रत्येक वजनांत कमतर येते पण त्याचा कस वाढतो, किंवा कृष्णपक्षांत चंद्रही एकेका कलेनें कमी कमी होतो, पण ती कलाही पितरांना पोषकच होते. कृष्णपक्षांतील चंद्राच्या एकेका कलेवर पितृगण आपली उपजीविका करतो अशी समजूत आहे. त्याप्रमाणें ज्ञान्यानें देखील मरेपर्यंत इतरांना ज्ञान देतच राहिलें पाहिजे असा अभिप्राय. **तुका: तूकाचा**—प्रत्येक वजनाचा. **पोखतां**—पोषण करतांना. **पितृपक्ष**—कृष्णपक्ष. **भ्रंशु**—कलानाश. **ओ. १०८.** त्याप्रमाणें आत्मज्ञानाच्या प्रसारासाठीं, प्राण, इंद्रियें व शरीर यांनीं कष्ट घेणें, जीवापाड प्रयत्न करणें, यालाच ‘ तप ’ म्हणतात. येथें ‘ धर्माचा ’ कांहींच संबंध नसल्यानें, ‘ सर्व धर्मांचिया ’ या पाठाहून ‘ स्वरूपाचेया ’ हा माडगांवकरांचा पाठ योग्य आहे. **आटणी**—क्लेश. **ओ. १०९.** अथवा तपाचें आणखी निराळें असें लक्षण आहे. ज्याप्रमाणें हंस दुधांत आपली चोंच घालतो. पहा—‘ हंसो हि क्षीरमादत्ते तन्मिश्रं वर्जयत्यपः । ’ हंस ज्याप्रमाणें दुधांत चोंच घालून दूध व त्यांतील पाणी वेगळें करतो. **अनारिसें** — निराळें. **सूदली**—घातली. **ओ. ११०.** त्याप्रमाणें देह व प्राण यांचा संयोग होत आहे असें पाहून जो विवेक तात्काळ मध्यें आपला हात घालुन त्यांचा वियोग करतो; तो विवेकच अंतःकरणांत बाळगला पाहिजे. आत्मानात्मविवेकानें, देह व आत्मा हे भिन्न आहेत असें ज्ञान मनांत सारखें जागृत ठेवलें पाहिजे. **उदेजत**—उत्पन्न होतांच. **पाणी सूये**—वियोग करण्यासाठीं जो आपला हात मध्यें घालतो. देह व आत्मा एक आहेत असें अज्ञान विवेकानें नष्ट होतें.

**ओ. १११.** आत्मविचार झाला असतां बुद्धीचा मार्ग कुंठित होतो. ज्याप्रमाणें जागा झालेल्या माणसाचें स्वप्न व झोंप दोन्हीही नाहींशीं होतात,

त्याप्रमाणें आत्मज्ञान झालेल्या माणसाच्या बुद्धीचे व्यापार संकुचित होतात, तो अंतर्मुख होतो. **पैसु**–प्रसार. **सांकडे**—संकोच पावतो. **जागणा**–जागणाऱ्याला, जागा झालेल्यास. **बुडे**—नाहीसें होतें. **सनिद्रा**—झोपेसह. **ओ. ११२.** याप्रमाणें जो आत्मानात्मविचार उत्पन्न होतो, तोच तपाचा खरा सिद्धांत होय. **निर्वचु**–सिद्धांत. **साचु**—खरा. **आत्मपर्यालोचु**–आत्मविचार. मागील ९७ ओंवींतील 'अधिकार पर्यालोचें' हा शब्द पहावा. **प्रवर्ते**–सुरू होतो. **ओ. ११३**–पुनः लहान मुलाच्या मनांत जसें आईचें स्तनपान, किंवा प्राणिमात्राच्या देहांत जसा प्राण असतो, त्याप्रमाणें प्रत्येक प्राणिमात्राबद्दल ज्याच्या मनांत सौजन्य असतें, त्यालाच आर्जव किंवा ऋजुता म्हणायाची. **आर्जव**—सरळपणा. **( श्लोक दुसरा ) ओ. ११४.** येथून दुसऱ्या श्लोकांतील पदांच्या व्याख्यानास आरंभ होऊन दवीसंपत्तीचें आणखी गुण स्पष्ट करतात. आणि कायावाचामनेंकरून जगाच्या सुखाकरितांच जो वागतो, तें अहिंसेचें लक्षण होय. **दोसें**—उद्देशानें, साटीं. पहा—" कैवल्य देआवेआं दोपें। शरणागतांसीं "—वच्छहरण ४०४. **रूप**—स्वरुप, लक्षण.

**ओ. ११५.** येथून 'सत्य' या गुणाचें विवेचन दृष्टांतांनीं करतात. "आतां जाईची कळी जात्याच तीक्ष्ण असूनही मृदु असते, किंवा चंद्राला तेज असूनहीं तें शीतल असतें. **जातीचें**–जाईची. **मुकुल**–पुष्पकळी. **ओ. ११६.** जें देतांच रोग घालवूं शकतें, व जिभेला तर जें कडू लागत नाहीं, असें औषधच सांपडणार नाहीं. मग उपमेला लागणारें साम्य त्या औषधांत कोठलें असणार ! **दाविलें**–दिलें असतां, योजना केली असतां. 'रोगु फेडु शके' असा अन्वय. **पाडु**—साम्य. **ओ. ११७.** तरी मऊपणाच्या बाबतींत डोळ्याच्या बुबुळाला लागलें तरी जें खुपत नाहीं, पीडा देत नाहीं, तेंच पाणी दुसरीकडे पर्वताच्या कडा फोडतें. अशीच सत्याची एकीकडे मृदु तर दुसरीकडे कठोर अशी स्थिति असते, असें या दृष्टांतांनीं स्पष्ट केलें आहे. **झगटितां**—लागलें असतां. **नाडळणें**—न आपटणें न खुपणें. **कराळें**—पर्वताचा कडा. **ओ.**

११८. त्याप्रमाणें संशय घालविण्यांत जें लोखंडाप्रमाणें कठीण किंवा तीक्ष्ण असतें, पण इकडे ऐकावयास जें इतकें गोड कीं, माधुर्यालाही तें लाजवितें. संशयनिवृत्ति करण्यांत जें न्यायनिष्ठुर, पण ऐकण्यास जें अतीशय मधुर असें सत्य भाषणाचें लक्षण येथें सांगितलें आहे." **तीख**–तीक्ष्ण. **स्राव्यत्वें**–श्राव्यत्वें,=ऐकण्यास. **पायीं घालीं**–तुडवी, मागें टाकी, लाजवी.

ओ. ११९. कौतुकानें आइकत उभें राहिलें असतां, एकीकडे जें कानाला आपल्या माधुर्यानें मुग्ध करतें तर दुसरीकडे सत्यपणाच्या निमित्तानें परब्रह्मालाही जें जिंकतें. **मूकें करि**–मुग्ध करी, गुग करी. येथे 'मुकें' बद्दल ' मुख ' असा पाठ स्वीकारला तर कानाचें मुखांत रूपांतर होतें, म्हणजे कानाला मुखाची लौल्यता प्राप्त होते असा अर्थ होईल. **साचारैवें**–साचारीव–सत्यपणा. **मखिं**–मिषें–मिषानें. ओ. १२०—फार काय पण आपल्या चांगुलपणानें दुसऱ्याला फसविणें हें त्यास ( सत्य भाषणास ) ठाऊक नसतें, व तें यथार्थ असूनही कोणाला टोंचणारें नसतें. **झांकउं**–झकवूं. फसवूं. **ओ**. १२१–या व पुढील ओंवींत सत्यभाषणाच्या उलट प्रकाराचें वर्णन केलें आहे. फार काय पारध्याचें गाणें• खरोखर गोड असतें, पण त्यांतील सत्याचा निर्णय करतां, तें शिकारी सावजांना अहितकरच असतें. आतां अग्नीचें जाळण्याचें कार्य अगदी उघड असतें, पण या त्याच्या खरेंपणास आग लागो ! या ओंवींत सत्याच्या उलट असणारे दोन प्रकार सांगितले आहेत. ( १ ) एक वर वर मोहक पण .अंतर्यामी अहितकारक व ( २ ) दुसरा कसलाही आडपडदा न ठेवतां, उघडपणानें अहितकारक. हे दोन्हीही प्रकार त्याज्य आहेत असे ज्ञानदेव सांगतात. **गोरी गायन**—हरिणादि सावजांना भुलविणारें पारध्याचें गायन. पहा— " पारधिया गोरि गातां। हरीणु लुब्धु होए गिता ॥–उद्धवगीता, ३७९. **साचाचां**–सत्याच्या,खऱ्या हेतूच्या. **पाखाळीं कीड**–निर्णयांतीं अहितकारक. पहा–" तया प्रेतसायाचा पाखाळु। रंकपणाचा उजाळु। "–उद्धव-

गीता–२०६. त्या गायनाचा खरा उद्देश काय हें पाहिलें, तर जें हरिणाचा जीव घेणार आहे.

**ओ. १२२.** जी वाणी कानाला गोड लागते, पण त्याच्या अर्थाकडे पाहिलें असतां जीं मर्मभेदक आहे, ती वाणी नसून सुंदर जखीण किंवा राक्षसीच म्हणावयाची. **महुर**–मधुर. **विभांडी**–फोडी. **जिव्हार**–काळीज **लाव**–जखीण **ओ. १२३.** सत्यभाषणाच्या खऱ्या लक्षणासाठीं, त्याला येथें मातेचा दृष्टांत दिला आहे. “ अहित होत असतांना आपल्या मुलावर लटकेंच रागावणें, पण त्याच्यावर प्रेम करतांना मृदु पुष्पाची वृत्ति धारण करणें, याप्रमाणें आईचें जसें स्वरूप असतें, तसेंच सत्यभाषणाचें असतें. **सोफ**–सोप=लटके, फोल. सारांश आई जशी आपल्या मुलाच्या हितासाठीं, लटकाच राग धारण करते, पण नेहमींची तिची मुलाबद्दलची वृत्ति प्रेमाची असते. सत्यभाषण असेंच अंतिम हितकारक असतें **मौ**–मऊ. **ओ. १२४**– जें भाषण कानाला सुख देण्यांत कुशल आहे, परिणामींही जें गोड आहे, व जें विकाररहित आहे, त्यालाच येथें सत्य असें म्हटलें आहे. **परिणामौनि साचार**–ज्याचा शेवट गोडींतच होतो.

**ओ. १२५.** आतां दगडाला पाणी घातलें तरीं त्याला जसा अंकुर फुटत नाहीं, किंवा लोणी घुसळलें तरी त्यापासून जशी कांजी प्राप्त होत नाहीं. **पाखाणु**–पाषाण–दगड. **आणी**–अंकुर. **ओ. १२६**–“ सापानें टाकलेल्या कातीच्या शिरावर लाथ हाणली असतां, ती जशी फडा वर काढीत नाहीं, किंवा वसंत ऋतूंत देखील आकाशाला जशीं फुलें लागत नाहींत. **हालेयां**– हाणलीं असतां. पहा– उद्धवगीता १११. **ओ. १२७.** अथवा रंभेच्या सुंदर रूपानें शुकाचार्याच्या मनांत कामविकाराचा उद्भव झाला नाहीं, किंवा राखेंत ओतलेल्या तुपानें ज्याप्रमाणें अग्नि प्राप्त होत नाहीं. **कंदर्प**–काम. **नाटोपे**–न मिळे. **ओ. १२८.** त्याप्रमाणें ज्या शब्दांनीं लहान मुलालाही राग यावा असे अपशब्द बोलले असतांही ज्याला राग येत नाहीं. **कुमार क्रोधु**–क्रोधरूपीं पिशाच. कुमार म्हणजे कार्तिकस्वामी हा मुलांच्या अंगांत येणाऱ्या १२ बालग्रहांपैकी पहिला होय. त्याच्यावर क्रोधाचें

रूपक केलें आहे. ज्या मंत्रांनीं क्रोधरूपी पिशाच्च अंगांत संचारेल, त्या मंत्राचीं बीजाक्षरें व इतर असंख्य कारणें जरी एकवटलीं तरी ज्याला क्रोध येत नाहीं. **मीनणें**–मिळणें. ओ. १२९. पण ब्रह्मदेव जरी पाया पडला तरी हे अर्जुना ! ज्याप्रमाणें मेलेला मनुष्य उठत नाहीं, तद्वत् ज्याच्यांत क्रोधाचा उमाळा आणला तरी येत नाहीं. मृत मनुष्यांत प्राण घालणें हें ब्रह्मदेवाला जसें अशक्य, तसेंच त्या माणसांत क्रोध उत्पन्न करणें अशक्य.

ओं. १३०–याच मनाच्या स्थितीला अक्रोधत्व असें भगवंतानीं नांव दिलें आहे. ओं. १३१. मातीचा त्याग केला असतां आपोआपच घटाचा त्याग होतो, किंवा तंतूचा त्याग केला असतां कापडाचा त्याग, व बीजाचाच मुळीं त्याग केला असतां वृक्षाचाही होतो. मूळ कारणाचाच त्याग केला असतां कार्याचा स्वाभाविकच त्याग होतो. ओं. १३२– **भींतीभाग** इ०–भिंतीचाच त्याग केला असतां तिच्यावरील चित्राचाही त्याग साहजिकच योतो, किंवा झोंपेचा त्याग केल्यानंतर स्वप्नांचाही नाश होतो. ओं. १३३. त्यागाचेंच लक्षण आणखी दृष्टांत देऊन सांगतात. **वरिषा**– वर्षा–पावसाळा. **भोग**–सुखोपभोग. ओं. १३४–त्याप्रमाणें बुद्धिमान् माणसांनीं शरीरावरचें ममत्व टाकून, सर्व संसाराचा पसारा सोडला पाहिजे. ओं. १३५. **यज्ञांगु**–यज्ञ हेंच ज्याचें अंग असा श्रीकृष्ण. **सुभगु**–भाग्यवान्. ओं. १३६. अर्जुनाच्या प्रश्नावरून भगवान् त्याला शांतीचें लक्षण विशद करतात. **लिंग**–स्वरूप. **चांग**–चांगलें. ओं. १३७. ज्ञेय, ज्ञाता व ज्ञान ही अभिमानत्रिपुटी जींत नष्ट होते, त्या मनःस्थितीला शांति असें ह्मणावयाचें. **माघौते**–मागून, नंतर. **निरुतें**-खरें, निश्चयात्मक. ओं. १३८. ज्याप्रमाणें प्रळयकाळचा पाण्याचा लोट जगाचा पसारा बुडवून आपण आपल्यांत भरून राहतो, सर्वत्र पाणीच पाणीं होतें. **उभडु**–लोट. **पवाडु**–विस्तार. **निबिडु**–आपण आपल्यांत घनदाट भरून राहतें. म्हणजे सर्वत्र व्यापून राहतें.

**ओं.** १३९. असें झाल्यावर मग तेथें उगम, ओघ असा व्यावहारिक भेद उरत नाहीं. (महापुरांत नदीचा उगम व प्रवाह समजत नाहीं.) सर्व जगच जलमय झाल्यावर तेथें पाण्याचें व्यावहारिक नांव तरी कोठून राहणार ? **जलवाच्यबोधु**–पाणी असें संबोधल्या जाणाऱ्या पदार्थाचा बोध. सर्वत्र जलच झाल्यावर मग पाणी कोणाला म्हणावयाचे व दुसरी वस्तु तरी कोणाला म्हणावयाचे ? पाण्याशिवाय दुसरा विषयच नाहीं. **ओं.** १४०. त्याप्रमाणें ज्ञेयाला नाहींसें केल्यावर, ज्ञातृत्वही पोटांत पडतें, नाहींसें होतें, व मग पुढें हे अर्जुना ! शांतीच केवळ उरते. **मिठी देणें**–नाहींसें करणें. **पोटीं पडणें**–लय होणें. अभिमानत्रिपुटीचा लय झाला म्हणजे जी अवस्था प्राप्त होतें, तीच शांति होय. **ओं.** १४१–येथून 'अपैशुन' या गुणावर व्याख्यान करतांना दृष्टांत देतात. आतां एकादा रोग रोग्याला दुःख देत असतां, त्या रोग्याला बळकट करण्याच्या चिंतेनें चांगला वैद्य जसा आपपर भाव ठेवीत नाहीं, सर्वच रोग्यांना सारखीच उपाययोजना करतो. **कदर्थणें**–कष्टी करणें. **बळीकरणेयाचिया**–बळकट करण्याच्या. **आर्धी**–चिंतेनें. **ओं.** १४२–किंवा चिखलांत रुतलेली गाय दुभतीं आहे, कीं आटलेली आहे, हा विचार न करतां तिच्या काकूळतीनें जो कासावीस होतो. **रुपली**–रुतली. **धड**–धडधाकट, दुभती. **भाखड**–दूध न देणारी, आटलेली. **ग्लानी**–दुःख, काकूळती. **कालाभुला**–कासावीस. पहा–'मग कालाभुला हांका देते वेळे। होतोसि परि डोळे नुघडिसी ॥'–तुकाराम.

**ओं.** १४३. किंवा एकादा दयाशील गृहस्थ, बुडणाऱ्याची जात विचारीत बसत नाहीं. त्याला बाहेर काढतो, व त्याचे प्राण रक्षण करावे हेंच जाणतो, **ओं.** १४४. किंवा एकादी कुलीन स्त्री दुर्दैवानें कदाचित् उघडी पडली, तर कोणताही अब्रुदार गृहस्थ तिला वस्त्रानें मंडित केल्याशिवाय तिच्याकडे पाहणार नाहीं. **माहेवणी**–कुलीन स्त्री. **निर्दैवें**–दुर्दैवानें. **विपाये**–कदाचित्. **सलज्जु**–अब्रुदार गृहस्थ. **ओं.** १४५. " त्याचप्रमाणें

अज्ञानामुळें अथवा इतर चुकामुळें, किंवा पूर्वकर्म वाईट असल्यामुळें, जे लोकनिंदेला पात्र झालेले आहेत. " **निंदित्वाच्या इ०**–निंदेच्या विषारी दृष्टीनें जे पाहिले जातात. **साविखीं**—विषयुक्त ( दृष्टीनें ). **ओं. १४६**–त्यांना आपलें चांगलें साह्य देऊन, त्यांना दुःख देणारी पीडा जे विसरावयास लावतात, त्यांच्या दुःखाचा जे विसर पाडतात. **सळ**–पीडा, गांजणूक. **सळणें**—छळणें, दुःख देणें. सळे सळणें–हा सजातीय क्रियापदाचा ( Cognate object ) प्रकार आहे. **आंगिक**—मदत, साह्य. **ओं. १४७.** अरे! दुसऱ्याचा दोष आपल्या कृपादृष्टीनें शुद्ध करून घेऊन जे त्याला आपल्या नजरेखालीं घेतात. **पुढिलाचा**—दुसऱ्याचा. **दिठी**–दृष्टीनें. **अवलोकु घेपे इ०**—त्याच्यावर आपली कृपादृष्टि फिरवितात. " दोषांचेंही गुण करणारें प्रेम, तयाचा भला । कवि तो कोठुन दोषायाला प्रियकर वन्य फुलाला !—टिळक—वनवासी फूल. **ओं. १४८. पुजुनि इ०**–ज्याप्रमाणें पूजा केल्यानंतर देवाचें दर्शन घ्यावे, किंवा पेरणी करूनच शेताला जावे, किंवा अतिथीला संतुष्ट करूनच त्याचा आशीर्वाद घ्यावा. **तोखौनि**—संतुष्ट करून.

**ओं. १४९.** त्याप्रमाणें आपल्या अंगच्या गुणानें दुसऱ्याचें न्यून दूर करून त्याच्याकडे कृपेनें पहाणें यालाच अपैशुन्य म्हणतात. **फेडणें**—घालविणें, **ओं. १५०**–उलट कोणाच्या वर्मावर घाव घालूं नये, कोणाला वाईट कामांत गुंतवूं नये, किंवा त्याला निंद्य नांवानें संबोधूं नये. **वांचूनि**–हें न करतां, उलटपक्षीं. **आतुडविणें**—गुंतविणें. **ओं. १५१.** कोणत्याही उपायानें पडलेला वर उभा राहील असें करावें, पण त्याच्या वर्मावर घाव घालूं नये. **ओं. १५२.** तर हे अर्जुना! उत्तमाच्या मानानें दुसऱ्याला हीन लेखणें, हें न करतां त्याचे दोष जो लक्षांतच घेत नाहीं **ओं. १५३. फुडें**—स्पष्ट. **मोक्षमार्गांचें इ०**–मोक्षाच्या मार्गातील विश्रांतिस्थान. **ओं. १५४**–येथून ' दयेचें ' लक्षण वर्णितात. **न कडसी**–( कडसणें )=विचार करीत नाहीं. पूर्णिमेचें चांदणें जगाला शांतवीत असतां, लहान थोर

असा भेद करीत नाहीं. ओं. ११५. त्याचप्रमाणें दुःखिताचें श्रम कृपाळू-पणानें हरण करतांना, हा थोर अथवा हा लहान असा विचारच ज्याच्या मनांत येत नाहीं. **शिणणें**—दुःख, कष्ट. **हिरतां**—हरतां. **सकणवपणें**-सदयपणानें. **विवंचू नेणें**–निवडूं न जाणें. **ओं. १५६.** आणखी दृष्टांत देतात. जगांत पाण्यासारखी वस्तु आपण आपलाच नाश करून घेते. पण नष्ट होणाऱ्या गवताच्या जीविताचें देखील ती रक्षण करते. **आंगे वर**–आपल्या आपणच. **उपखे**-नाश पावते. पद्दा—" जैसें बहिरियाचिये स्थानी। उपखे कोकिळांची रंगध्वनी ॥ " उद्धवगीता–६२४. **जातें-जीवित**–जाणारें जीवित, नष्ट होणारें जीवित.

**ओं. १५७.** त्याप्रमाणें दुसऱ्याच्या दुःखानें कळवळून जाऊन कृपेनें आपण कितीही दिलें तरी तें ज्याला थोडेंच वाटतें. **ओं. १५८.** वाटेंतला सखल भाग अगर खळगा भरून काढल्याशिवाय पाणी जसें पुढें जात नाहीं, त्याप्रमाणें दुसऱ्याला संतुष्ट केल्याशिवाय जो पुढें जात नाहीं. **निम्न**–सखल जागा. **उणें**–वाचून, शिवाय. **ढळणें**–हालणें. **अनतोखौनि**–अनतोषौनि-संतुष्ट केल्याशिवाय. **ओं. १५९.** पायांत कांटा शिरला तर त्याचें दुःख काळजांत उमटतें, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या दुःखानें ज्याचें अंतःकरण पोळतें. **निहटणें**–जोरानें शिरणें. **ओं. १६०.** किंवा पायांना थंडपणा प्राप्त झाला कीं डोळ्यांनांही तो प्राप्त होतो. त्याप्रमाणें दुसऱ्याच्या सुखानें ज्याला सुख होतें. **सुखावणें**–( नाम क्रियापद )–सुखी होणें. **ओं. १६१.** फार काय ताहनेल्यालाच पाणी अनुकूल असतें. त्याप्रमाणें दुःखिताकरतांच ज्याचा जन्म आहे. **आराइणें**–अनुकूल असणें. **दुःखिताचा भागीं**–दुःखिता-साठीं. **ओं. १६२. मूर्त**–मूर्तिमंत. असा वर वर्णन केलेला जो पुरुष असेल तो हे वीरश्रेष्ठ अर्जुना ! मूर्तिमंत दयाच समज. **उदैजत**–जन्मतः **रिणियां कीजे**–त्यानें जन्मतःच मला ऋणी करून ठेवलें आहे. **ओं. १६३.** येथून ' अलोलुप्त्वं ' या गुणाचें स्पष्टीकरण करतात. सूर्यविकासी कमळें स्वाभाविकच सूर्याला अनुसरतात, सूर्योदयाबरोबर तीं विकसतात.

पण त्यांच्या सुगंधाला सूर्य शिवत नाहीं. आपण त्यांच्यावर उपकार करूनही त्यांच्याकडून तो कशाचीही अपेक्षा करीत नाहीं. **जीवें**–स्वभावें. **राजीव**–सूर्यविकासी कमळ.

**ओं.** १६४. किंवा वसंतऋतूच्या ओघांत पुष्कळ वनश्री येते, वसंत ऋतूंत वनश्रीला नुसता बहर येतो. पण तो तिचा आस्वाद न घेतांच जातो. **वाहाणी**–ओघ. **अक्षौणी**–पुष्कळ संख्या. **घेणी**–स्वीकार. **ओं.** १६५.—फार काय पण महासिद्धीसह लक्ष्मी जरी जवळ आली, तरी विष्णु तिला गणीत नाहीं, तिची कदर करीत नाहीं. विष्णु तिला पाय रगडावयास बसवितो. **ओं**. १६६. त्याचप्रमाणें ऐहिक किंवा स्वर्गीय भोग, इच्छा होतांच हजर होणारे चाकर झाले, तरी त्यांचा उपभोग घ्यावा असें ज्याच्या मनांतही येत नाहीं. पूर्ण अनुकूलता असूनही जो त्यांचा उपभोग घेत नाहीं. **पाईक**–चाकर. **ओं**. १६७. फार काय, कौतुकपूर्ण विषयांत देखील ज्याचें मन विषयाभिलाषी होत नाहीं, तिलाच 'अलोलुपत्व' दशा म्हणतात. **ओं**. १६८. येथून ' मार्दव ' पदाचें लक्षण सुरू होत असून, त्याच्या स्पष्टीकरणार्थ ज्ञानेश्वर अनेक काव्यमय सुंदर दृष्टांत देतात. पहिला दृष्टांत जलाच्या मृदुत्वाचा व आकाशाच्या मोकळेपणाचा घेतला आहे. **ओ**. १६९. **दोसे**–उद्देशें, बालकाबद्दल. **वसंतिचा इ०**– वसंतऋतूच्या स्पर्शानें वारा जसा सुखकर होतो. **मौ**–मऊ—सुखकर. **ओं**. १७०. डोळयांना प्रियवस्तूची अगर माणसाची भेट झाली असतां जसें समाधान होतें, किंवा कासवीची आपल्या पिलावर जशी प्रेममय दृष्टि असते, तशीच सर्व प्राणिमात्राशीं ज्याची प्रेमळ वागणूक असते. कासवी आपल्या प्रेममय दृष्टीनेंच आपल्या पिलांना पोसते असा समज आहे. पहा–" प्रतिदिन इस दृष्टीं कासवाचेचि देखा "–सामराज–रुक्मिणीहरण. **मौवाळ**—मृदु, प्रेममय. **ओं**. १७१. आतां स्पर्शाला जो आतीशय मऊ आहे, रुचीला जो गोड आहे, वासाला जो सुवासिक आहे व कांतीनें जो तेजस्वी आहे. **उजलु**–तेजस्वी, उज्ज्वल.

ओं. १७२. असा कापूर वाटेल तितका सेवन केला असतांनाही जर अपायकारक झाला नसता, तर त्याचीच उपमा येथे दिली असती. मृदुत्वाचें वर्णन करतांना कापरामध्यें इतके गुण आहेत कीं, त्याचीच उपमा दिली असती, पण तो खाल्ला तर अपायकारक आहे, या वैगुण्यामुळेंच त्याला वगळावा लागला. आवडे इ०—इच्छा होईल तितका, वाटेल तितका. ओं. १७३. पण पंचमहाभूतें आपल्या पोटांत वाहून व सूक्ष्म परमाणूंत देखील आपण स्वत: सामावून आकाश जसें जगाच्या आकाराप्रमाणें आकार धारण करतें, त्याचप्रमाणें जो जगानुसार वागतो. आकाश पंचमहाभूतांना पोटांत वागविण्याइतकें विस्तृत आहे, तर एका सूक्ष्म परमाणूंत कोंडलें जाण्याइतकें आटपशीर होतें. अशी विश्वाप्रमाणें बदलण्याची ज्याची पात्रता आहे, त्याच्यांतच खरें मार्दव आहे असें म्हणावयाचें. माए—मावतें. ओं. १७४. फार काय सांगू ? ज्याचें जगणें जगाचें जीवप्राणच होत, ( जो जगाकरतांच जगतो, )—त्यालाच मार्दव ह्मणावयाचें. ओं. १७५. येथून ' ऱ्ही ' या गुणाचा अर्थ सांगतात. कदर्थिजे इ०—लाजेनें दु:खी होतो. कां मानिया इ०—किंवा मानी पुरुष फजीतीमुळें जसा निस्तेज होतो. मानिया—मानी पुरुष. निकृष्ट—फजिती. ओं. १७६. अथवा एकादी चांडाल स्त्री जर दारूसह एकाद्या संन्याशाकडे आली तर त्या शुद्ध वर्तनाच्या पुरुषास जशी लाज वाटते. अवचटें—आकस्मात्. पहा—' क्षुधेतें शाकान्नें अवचट सुवस्त्रीं मिरवितो.—हरिपंडित. ज्ञानेश्वरकालीं चातुवर्ण्य व संन्यास यांच्या श्रेष्ठत्वाबद्दल मोठा कटाक्ष होता असें दिसतें. ओं. १७७. रणांतून पळून जाऊन आपला जीव बचावणें व जगणें, ही लज्जास्पद स्थिति कोणता क्षत्रिय सहन करील ! किंवा महापतिव्रता वैधव्यांत जशी काळ कंठूं शकणार नाहीं. वेळु नेणें—काळ कंठणें. वैधव्यांत काळ कंठणें, महासतीला अतिशय लज्जास्पद वाटेल. ती त्या वेळच्या आचाराप्रमाणें सतीच जाईल.

ओं. १७८. रूपसा—रूपवंतास. कुटीचे बोट—निंदापवाद, डाग. त्या

लाजेनें त्यांना प्राणसंकट आल्याप्रमाणें वाटतें. **ओं** १७९. त्याप्रमाणें पुनः पुनः जन्मणें व तितक्याच वेळां मरणें, हीं लज्जास्पद स्थिति होय. **आउटहातेपणें**–साडेतीन हाताच्या देहाचे. **हें शव इ०**–मरून प्रेत होऊन जाणें. **उपजों इ०**—उपजून उपजून पुनः पुनः मरणें. जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडणें हें अत्यंत लाजीरवाणें होय, असा ज्ञानेश्वरांचा आशय. **नावांनावां**-वारंवार. पहा–" उपजणें मरणें न चुके नरा। फिरत नित्य असे भवभोंवरा "– वामन. **ओं**. १८०–त्या गर्भाशयाच्या मेदाच्या मुशींत रक्त, मूत्र, रेत इत्यादि रसांनीं ओतला जाऊन हा देह उत्पन्न होणे, हें फार लाजिरवाणें आहे. प्रत्येक जन्माच्या वेळीं मळमूत्राचा बांधा असा देह धारण करणें फार किळसवाणें आहे. **ओं**. १८१. फार काय पण प्रत्येक वेळां मरणोत्तर देह धारण करणें, व कोणत्या तरी नांवानें व रूपानें जगांत येणें किंवा जन्म घेणें याहून लाजीरवाणी गोष्ट कोणतीच नाहीं. **ओं** १८२. अशा या दुर्दशेमुळें, या शरीराचा जो कंटाळा केला जातो, ती मनाची अवस्थाच निर्मळ अशा साधूच्या मनाची लाज होय. अमंगळाला मात्र ती गोडच वाटते. **अवकळा**–दुर्दशा. **घेपे**–घेतला जातो. 'घे' धातूचें कर्मणी प्रयोगाचें रूप. **कांटाळा**–कंटाळा, त्रास. **निसुग**—अमंगळ मनुष्य. **ओं**. १८३. आतां ज्याप्रमाणें दोरा तुटला असतां कळसूत्री बाहुल्यांचें चलनवलन थांबतें, किंवा शरीरांतून प्राण निघून गेल्यावर कर्मेंद्रियांची गति खुंटते. **साइखेडे**—खांबसूत्री बाहुली. **कर्मेंद्रियें**–कर्में करणारीं हस्त, पाद, गुद, उपस्थ व वाणी हीं इंद्रियें.

**ओं**. १८४–किंवा सूर्य मावळला असतां, जसा त्याच्या किरणांचा पसारा संपुष्टांत येतो, त्याचप्रमाणें मनाच्या संयमानें बुद्धि व इंद्रियें यांचा व्यापार थांबतो. **ओं**. १८५. याप्रमाणें मन व प्राण यांचा संयम केला असतां, दशेंद्रियें निःशक्त होतात. हें 'अचापल्य' धर्मानेंच घडतें असें समज. तिसऱ्या श्लोकांत दैवी संपत्तीच्या राहिलेल्या गुणांचें वर्णन आलें असून ज्ञानेश्वरांनीं प्रथम 'तेज' या पदाचा अर्थ विशद करतांना, नेहमीप्रमाणेंच दृष्टांतांचा अवलंब केला आहे. **( श्लोक तिसरा ) ओं**. १८६. अगोदर

मरणासारखा वाईट प्रसंग व तोही सती जातांना अग्निप्रवेशानें प्राप्त झालेला ! पण पतिव्रता स्त्री आपल्या भ्रताराकरितां त्याचीही फिकीर करीत नाहीं. **ओं.** १८७ त्याप्रमाणें आत्मरूपी पतीच्या प्राप्तीच्या चिंतेनें विषयरूपी बांधांमधून व शून्याच्या म्हणजे ब्रह्मनिर्वाणाच्या पाणधींतून ज्याला जाणें आवडतें **विषयविषाची इ०**—विषयरूपी विषाचा संबंध तोडून. **बांधी**—संबंध, बंधन. **लाऊनि**—तोडून, ( ला = तोडणें ). **शून्याची पाणधी**—निर्वाणपदाच्या अवघड रस्त्यानें. हटयोगादि अवघड उपायानीं आत्मप्राप्तीचा मार्ग जो अवलंबतो. अनेक विषय भेडसावींत असतां, त्यांना तोडून टाकून जो हटयोगानें ब्रह्मपदाचा मार्ग चोखाळूं इच्छितो. **पाणधी**—दोहों बाजूस कुंपण असून मध्यें वाट असते ती जमीन.

**ओं.** १८८. हें करीत असतां ज्याला शास्त्राच्या विधिनिषेधाची अडचण भासत नाहीं, किंवा महासिद्धीच कौतुकही वाटत नाहीं, अथवा इच्छा होत नाहीं. **ओं.** १८९. याप्रमाणें ईश्वराकडे ज्याचें मन आपणहून धांवतें, त्यालाच आध्यात्मिक 'तेज' असें म्हणावयाचें. **निज**—मन. **ओं.** १९०. यांत 'क्षमे' चे स्वरूप सांगतात. आतां सर्व अडचणी सोसणाऱ्याचा मोठेपणा जो गर्वापर्यंत पोचत नाहीं, सर्व अडचणी सोसण्याचें बळ असूनही ज्याला गर्व चढत नाहीं त्यालाच क्षमा असें म्हणतात. ज्याप्रमाणें आपल्यावरील केस आपण वाहत आहो याची देहाला जाणीव नसते, त्याप्रमाणें आपण सोसलेल्या अडचणींची ज्याला जाणीव नसत, तीच क्षमा. **साहता**—सोसणारा. **गरिमा**—मोठेपणा. **रोम**—केश. **ओं.** १९१. आणि मातलेल्या इंद्रियांचे आवेग, किंवा उसळी खाणारे जुने अंगांत मुरलेले रोग अथवा प्रियजनांच्या वियोगाचे व नावडत्या माणसाच्या भेटीचे प्रसंग. **ओं.** १९२. या सर्व आपत्तींचा पूर एकदम अंगावर आला असतां, जो अगस्ति ऋषीप्रमाणें धैर्यवान् होऊन त्यांना तोंड देतो. अगस्ति ऋषीनें जसा धैर्यानें समुद्र पिऊन टाकला, तसा सर्व आपत्तींचा समुद्र जो पिऊन

टाकतो. ओं. १९३. रेखा–रेषा. लोट. आगळिका —आधिक्यानें. येकीं झुळुका – एका झुळुकीनें ( तृ. ). ज्याप्रमाणें आकाशांत उठलेला मोठा धुराचा लोट वाऱ्याच्या एका झुळुकेनें गिळून टाकला जातो. ओं. १९४. त्याप्रमाणें आधिभौतिक, आधिदैविक व अध्यात्मिक असें त्रिविध ताप प्राप्त झाले तरी जो त्यांना पिऊन टाकतो.

ओं.१९५. याप्रमाणें चित्तक्षोभ होण्याच्या प्रसंगीं जें धैर्याला उचलून धरून हित साधणें, त्यालाच 'धृति' म्हणतात; चांगावा करणें— हित साधणें. अवधारी – लक्षांत ठेव. ओं. १९६. येथें शौच अथवा शुचित्व याचें लक्षण देतात. आतां जो सुवर्णकलश गंगेच्या पाण्यानें भरलेला आहे, त्याच्यासारखेंच शुचित्वाचें लक्षण असतें. निर्वाळूनि–निर्मळ करून, गंगापीयूखें–गंगामृतानें. कनक व गंगाजल यांमुळें त्या तांब्याला निर्मलत्व व पावनत्व प्राप्त होतें. ओं. १९७. ज्याच्या अंगांत निरिच्छ वागणूक व मनांत खरा विवेक आहे, तो अंतर्बाह्य शुचित्वाची मूर्तिच म्हणावयाचा. ओं. १९८. फेडित—नाश करीत. ताप —त्रिविधताप पादप—वृक्ष. आप – पाणी. गंगा पवित्र असल्यामुळें, ती प्राणीमात्राचें पापही घालवितें. ओं. १९९. जगाचें आंधळेपण घालवीत, लक्ष्मीची देवळें उघडीत, सूर्य जसा पृथ्वीप्रदक्षिणेला निघतो. सर्वत्र प्रकाश पाडल्यानें सूर्य जणु लक्ष्मीची देवळेंच उघडीत असतो. राउळें—देवळें. सूर्य फिरतो अशी ज्ञानेश्वरकालीन समजूत दिसते. ओं. २००–त्याचप्रमाणें जे संसारबद्ध झाले आहेत, त्यांना त्यांतून सोडवून, व जे संसारांत बुडाले आहेत त्यांना बाहेर काढून, पीडितांची संकटें जो निवारण करतो. सांकडीं–संकटें. ओं. २०१– फार काय, रात्रदिवस जो दुसऱ्यांना सुख व उन्नति आणीत असतांच त्यांचें हित करतो, त्यांना हितांत प्रवेश करावयास लावतो. स्वार्थ—हित.

ओं. २०२. याशिवाय प्राणिमात्रांचें हित करीत असतां, आपल्या स्वतःच्या कार्यासाठीं, संकल्पाची, आशेची अडचण उत्पन्न न करणें,

**दुसऱ्याचें** हित करीत असतां त्यांत आपलाही हात धुतला जावा, अशी आशाही जे बाळगीत नाहींत. **वाचौनि**—याशिवाय. **संकल्प**—आशा. **आडवंगी**—प्रतिबंध, अडथळा. **ओं. २०३.** 'अद्रोहत्व' म्हणजे या अशा गोष्टीं आहेत. **हें दिठी ए तैसें सांघितलें**—तुझ्या दृष्टीच्या टप्प्यांत येईल तसेंच सांगितलें, तुला आकलन होईल तसेंच सांगितलें. **ओं. २०४.** **येथून** 'अमानित्वाचें' वर्णन करतात. एवढी थोरली गंगा, पण शंकराच्या जटेंत जी सामावली. त्याप्रमाणें थोर पद प्राप्त झालें, तरी जें लाजणें अथवा विनय धरणें त्यालाच अमानित्व असें म्हणतात. भगीरथानें गंगेची प्रार्थना **करून** तिला मृत्युलोकांत आणतांना शंकरांनीं तिला आपल्या जटेंत धारण केल्यावर तिच्या वेगाचा गर्वपरिहार होऊन ती जशी संकुचित झाली, त्याप्रमाणें थोर पद प्राप्त झालें असतां जो मनांत लाजतो. **ओं. २०५.** **मागां इ०**—हाच विषय मागें म्हणजे १३ व्या अध्यायाच्या ७—११ श्लोकांत ज्ञानाचीं लक्षणे सांगतांना आला आहे. पहा—'अमानित्वमदंभित्वमहिंसा क्षांतिरार्जवम् । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ।' यांतही 'अमानित्व' हा गुण आला असून, त्यावरील ज्ञानेश्वरांचें व्याख्यान **पहा**—

" तरी कवणेही विषयींचें । साम्य होणें न रुचे । संभावितपणाचें वोझें जया ॥ १८५ ॥ आथिलेचि गुण वानितां । मान्यपणें मानितां । योग्यतेचें येतां । रूप आंगा ॥ १८६ ॥ तैं गजबजों लागे कैसा । व्याधें रुंधला मृगु जैसा । कां बाहीं तरतां वळसा । दाटला जेवीं ॥ १८७॥ पार्था तेणें पाडें । सन्मानें जो सांकडे । गरिमेतें अंगाकडे । येवोंचि नेदी ॥१८८॥ पूज्यता डोळां न देखावी । स्वकीर्ति कानीं नायकावी । हा अमुका ऐसी नोहावी । सेचि लोकां ॥ १८९ ॥ तेथ सत्काराची कें गोठी । कें आदरा देईल भेटी । मरणेसीं साटी । नमस्कारितां ॥ १९० ॥ वाचस्पतीचेनि पाडें । सर्वज्ञता तरी जोडे । परि वेडिवेमाजि दडे । महिमेभेणें ॥१९१॥

चातुर्य लपवी । महत्व हारवी । पीसपण मिरवी । आवडोनी ॥ १९२ ॥ लौकिकाचा उद्वेगु । शास्त्रांवरी उबगु । उगेपणीं चांगु । आथी भरु ॥१९३॥ जगें अवज्ञाचि करावी । संबंधीं सोयचि न धरावी । ऐसी ऐसी जीवीं । चाड बहु ॥ १९४ ॥ तळौटेपण बाणे । आंगीं हिणावो खवणें । तें तचि करणें बहुत करूनी ॥ १९५ ॥ हा जीतु ना नोहे । लोक कल्पी येणें भावें । तैसें जिणें होआवें । ऐसी अशा ॥ १९६ ॥ पैं चालतु कां नोहे । कीं वारेनि जातु आहे । जना ऐसा भ्रमु जाये । तैसें होइजे ॥ १९७ ॥ माझें असतें-पण लोपो । नामरूप हारपो । मज झणें वासिपो । भूतजात ॥ १९८ ॥ ऐसी जयाची नवसिये । जो नित्य एकांता जातु जाये । नामेंचि जो जिये । विजनाचेनि ॥ १९९ ॥ वायू आणि तया पडे । गगनेसीं बोलों आवडे । जीवें प्राणें झाडें । पढियंतीं जया ॥ २०० ॥ किंबहुना ऐसीं । चिन्हें जया देखसी । जाण तया ज्ञानेंसी । शेज जाहली ॥ २०१ ॥ पैं अमानित्व पुरुषीं । तें जाणावें इहीं मिषीं । आतां अदंभाचिया वोळखीसी । सौरसु देवो ॥ २०१ ॥ " हें अमानित्वाचें लक्षण जें तेराव्या अध्यायांत विस्तारानें सांगितलें आहे, तेंच येथे सोळाव्यांत थोडक्यांत दिलें आहे. केती — किती. तेंच किती सांगायचें ?

ओं. २०६. याप्रमाणे ही दवी संपत्ति म्हणज सव्वीस गुणरूपी ब्राह्मणांनी वसति केलेले व मोक्षरूपी सार्वभौम राजानें अग्रहार दिलेले २६ गांवच होत. दैवी संपत्तीचे हे सव्वीस गुण म्हणजे परब्रह्माची प्राप्ति करून देणारे असून, हे आत्मसात् केले असतां मोक्ष ठरलेलाच. **ब्रह्मगुणि**— —गुणरूपी ब्राह्मणांनीं वसति केलेले. **मोक्षचक्रवर्ति** इ० मोक्षरूपी चक्रवर्ति राजाचे. **अग्रहार**—देवब्राह्मणांस योगक्षेमार्थ दिलेला गांव इत्यादि. ( याचा नपुंसकलिंगीं उपयोग केला आहे. ' सविसें अग्रहार ' असा अन्वय ). ओं. २०७. किंवा ही दैवी संपत्ति म्हणजे निावणरूपी सगर राजांचा उद्धार करण्यासाठीं पृथ्वीवर अवतीर्ण झालेली २६ गुण तीर्थांची

गंगाच होय. सगरांचा उद्धार करण्यासाठीं गंगा जशी पूर्वी पृथ्वीवर अवतीर्ण झाली, तशी विरक्त झालेल्या मुमुक्षूंच्या उद्धारार्थ ही २६ गुणतीर्थांची गंगाच अवतीर्ण झाली आहे, अशीं ही सुंदर रूपकोत्प्रेक्षा येथे केली आहे. **गुणतीर्थांची**—दैवी संपत्तीच्या २६ गुणरूपी तीर्थांनीं युक्त. **निर्विण्ण**—विरक्तरूपी सगरांची. **दैवी**—स्वर्गीय. **आली**—अवतीर्ण झाली.

ओं. २०८. किंवा मुक्तिरूपी तरुणी, ही २६ गुणरूपी कुसुमांची माळ घेऊन विरक्तीचें भाग्य प्राप्त झालेल्या पुरुषाचा गळा, ( त्याला ही माळ घालण्यासाठीं ) शोधीत आहे जणु. विरक्ति प्राप्त झालेल्या मुमुक्षूस ही सव्वीस गुणांची दैवी संपत्ति प्राप्त झाली असतां, हातोहात मुक्ति मिळते असा सांगण्याचा अभिप्राय. **मुगुतीबाला**—मुक्तिरूपी तरुणी. **वैराग्य-भाग्य**—वैराग्याचें भाग्य प्राप्त झालेल्या पुरुषाचा. **गिवसणें**–शोधणें. येथें मुक्ती व वैराग्याचा विषय चालू असतां, त्यांच्यावर स्वयंवरप्रसंगाची केलेली रूपकोत्प्रेक्षा विरोधानें चमत्कृतिजनक झाली आहे. ओं. २०९. किंवा सव्वीस गुणांच्या ज्योतींनीं पाजळलेली ही आरती घेऊन गीताच जणु आपल्या आत्मरूपी पतीस ओवाळण्याकरितां आली आहे. **उजळूनि**—प्रकाशित करून, पाजळून. **नीरांजना**–ओवाळणीला ( द्वि ). गीतेंतील या २६ गुणांच्या प्राप्तीमुळें, आत्मप्राप्ति ठरल्यासारखीच आहे असा अर्थ. **आत्मेया इ०**–आत्मरूपी भ्रतारास. ओ. २१०. गीतासागरांतील दैवी शिंपले, हे २६ गुणरूपी उज्वल मोती जणु बाहेर टाकीत आहेत. ही रूपकोत्प्रेक्षा दखील सुंदर व भव्य आहे. **उगळणें**–बाहेर टाकणें. **गुणमय**–दैवीसंपत्तीच्या २६ गुणांची. **कळें**—मला वाटतें. ( मन्ये ) ओं. २११. अशा विस्तारानें स्पष्ट केलेल्या या दैवी गुणसंपत्तीच आणखी काय वर्णन करूं ? **पैसेंसीं**–विस्तारपूर्वक. चवथ्या श्लोकांत आसुरी संपत्तीची

लक्षणें दिलीं आहेत. (श्लोक चवथा) ओं. २१२. आतां दुःखाची सलग अशी वेली, कालाच्या हातांतील लोखंडी भालाच, अशी ही आसुरी संपत्ति ध्यानांत घे. **अतूट**–सलग. अशा वेलीला दुःखाचीच फुलें येणार. **भाली**–ही आसुरी संपत्ति लोखंडाच्या भाल्याप्रमाणें मारक होणारी आहे. **ओं. २१३.** आतां ही संपत्ति निरुपयोगी असली, तरी काय टाकावयाचें तें टाकण्यास समजावें म्हणून ती चांगली कान देऊन ऐक. **श्रोत्रशक्ति**–कानाच्या शक्तीनें, कानाची शक्ति एकवटून. **ओं. २१४.** ही आसुरी संपत्ति म्हणजे नरकाची मोठी आपत्ति आणण्यासाठीं भयंकर दुर्गुणांनीं केलेला एकत्र मेळावा होय. **दोखीं**—दोषीं. **ओं. २१५.** अथवा सर्व विषांचा एकोपा झाला म्हणजे त्याला जसें बासट असें म्हणतात, त्याप्रमाणें आसुर संपत्ति ही सर्व दोषांचा गोळा आहे. **बासटु**—पुष्कळ विषें एकत्र करून बनविलेला पदार्थ. पहा—" या बोलाचा बासटु । न साहेचि उद्धवदेवो सुभटु ॥ –उद्धवगीता–७१. **खोटु**—खोट = गोळा.

**ओं. २१६.** आसुरी संपत्तीचा दंभ हा पहिला दुर्गुण सांगतात. आसुर संपत्तींतील दुर्गुणांत जो थोर म्हणून प्रसिद्ध आहे, तो दंभ होय. **वाडपण**–थोरपणा. **डांगोरा**–प्रसिद्धी. **ओं. २१७.** आतां ही गोष्ट दृष्टांतांनीं स्पष्ट करतात. ज्याप्रमाणें आपल्या आईला विवस्त्र करून लोकांत उघडपणें दाखविली असतां, ती पवित्र असूनही जशी आपल्या ( मुलाच्या ) अधःपातास किंवा अपकीर्तीला कारण होते. **नग्न दाविलेया इ.**–तिला विवस्त्र करून दाखविली असतां. **ओं. २१८.** किंवा आपल्या गुरूपासून मिळविलेल्या विद्येचा जर चव्हाट्यावर पुकारा केला, तर ती विद्या मूळची हितकारक असून जशी अहिताला कारण होते. **बोबाइलेया**–बोभाणें = पुकारणें. **चौहटा**–चव्हाट्यावर. **ओं. २१९** किंवा जी नाव स्वतःस महापुरांत अडकवून घेऊन इतरांचें पैलतीराला नेऊन रक्षण करते, तीच जर कोणी

आपल्या डोक्याला बांधली तर जशी बुडविते. **दाटली**–दाटणें = अडकविणें **ओं.** २२०–पुन: जीवाचें पोषण करणारें अन्न, खातांना जर प्रशंसा करून खाल्लें, तर तेंच अन्न हे पार्था ! जसें विष होतें. **ओं.** २२१. त्याप्रमाणें दृष्ट व अदृष्ट कर्मांचा सारखाच मित्र असणारा जो धर्म त्याचा पुकारा केला असतां, तो आपणांस तारक न होता दोषास्पद अथवा मारक होतो. कोणत्याही गोष्टीची अवास्तव प्रसिद्धी करणें अंतीं तोट्याचें होतें; अवास्तव प्रसिद्धीला अगर जाहिरातबाजीलाच येथें दंभ म्हटलें आहे. **जाला**–झाला असतांना. **फोकरिजे**–फोकरणें = पुकारा करणें. पहा–"धावां फोकरीतु ब्रोले तैसें । दीशांप्रति ॥"–ऋद्धिपुरवर्णन २५.

**ओं.** २२२. म्हणून वाणीच्या चव्हाट्यावर जर धर्मांचा बाजार मांडला, तर हे वीरा ! अर्जुना ! तोच धर्म अधर्म होतो, व तोच दंभ असें समज. **चौबारां**–चव्हाट्यावर. **ओं.** २२३—येथून 'दर्प' या दुर्गुणावर व्याख्यान सुरू होतें. 'आतां मूर्खाच्या जिभेवर कांहीं चांगल्या अक्षरांचे शिंतोडे उडाले असले, तरी तो जसा ब्रह्मदेवाच्या सभेंत रममाण होत नाहीं. मूर्खाला एक दोन अक्षरें आलीं म्हणून विद्वानांच्या सभेंत त्याला काय गोडी वाटणार ? **आंबुखा**—शिंतोडा (सं–अभ्युक्षण). **ब्रह्मसभा**—ब्रह्मदेवाची सभा. **न रिझे**–रममाण होत नाहीं. त्या मूर्खाला आपला चार दोन अक्षरांचा गर्व असतो, पण विद्वानांच्या सभेंत त्याची काय रीझ ? **ओं.** २२४. किंवा चाबुकस्वारांचा घोडा गर्वानें गजश्रेष्ठालाही कमी लेखतो, किंवा कांट्यावरल्या सरड्याला आकाश ठेंगणेंच वाटतें. सरड्याची धांव कुंपणापर्यंत असली तरी त्याचा ताठा दांडगा असतो. **मांदुरी—**चाबुकस्वार. पहा—'सर्वे हडपु सागळिया सुआरू : देव्हारु–बडुवा दिवटा वेचकरु । भांडारी भोई मादुरी चवरधरू । हे दाही जण ॥ ६९५ ॥–नरेंद्र. 'व्योम नीच मानी' असा अन्वय. **ओं.** २२५.–गवताच्या सर्पणानें अग्नि आकाशापर्यंत धांवतो, तसाच डबक्याच्या बळावर मासा समुद्रालाही कमी

लेखतो. हें सर्व अर्ध्या हळकुंडानें पिवळ होण्याच्या त्यांच्या गर्वामुळेंच होय. आपली शक्ति काय व आपण करतो काय, याचा अदमास नसणाऱ्यांच्या अंगांतच असा अनाटाई दर्प असतो. **थिल्लर**–डबकें. **ओं. २२६.** ज्याप्रमाणें एकादा भिकारी एकाच दिवसाच्या परान्नानें माजतो, त्याप्रमाणें जो स्त्री, धन, विद्या स्तुति व बहुमान यांनीं मदोन्मत्त होतो, त्यालाच दंभ म्हणावयाचें. **दीचेनि** – दिवसाच्या. एका दिवशीं मिळालेल्या परान्नानें. **अल्पकु**—भिकारी.

ओं. २२७. एक दिवस ढगांची सावली मिळाली म्हणून दुर्दैवी मनुष्य आपलें कायमचें घर मोडतो, किंवा मृगजळ पाहून मूर्ख माणूस ज्याप्रमाणें नित्य पाणी देणारें तळेंच फोडून टाकतो. असें हातचें सोडून पळत्याच्या पाठीमागें लागण्यास, त्यांच्या मूर्खपणाबरोबरच त्यांच्या अंगांतला ताठा अथवा गर्वच कारणीभूत होतो. **जोडी**–प्राप्ति. **निदैवु**–दुर्दैवी. **मृगांभ**–मृगजल. **पाणियड**–पाणियडे=तळें. **ओं.** २२८. फार काय संपत्तीमुळें या प्रमाणें जें मदोन्मत्त होणें, तोच दर्प होय. **अनारिसे इ०**–यापेक्षां निराळें न सांगताच, काय तें समज. **ओं.** २२९. आतां ‘ अभिमाना ’ कडे वळतात. ‘ आणि जगाचा वेदांवर विश्वास आहे, ईश्वर जगाला पूज्य आहे, व सूर्य हा जगांत एकटाच तेजस्वी आहे. **ओं.** २३०. त्याचप्रमाणें सार्वभौमपद हेंच सर्व जगाच्या आकांक्षेचें स्थान आहे, व न मरणें हेंच जगाला प्रिय आहे. **आस्पद**–स्थान. **ओं.** २३१. म्हणून लोक मोठ्या उत्साहान, वेद, ईश्वर व सूर्य यांचें वर्णन करतात, पण तें एकुनच जो त्यांचा ( वेदादिकांचा ) मत्सर करतो. मोठ्यांचा मत्सर करणें यालाच वृथाभिमान म्हणतात. **ओं.** २३२. यांत या अभिमानी माणसांची विचारसरणि दिली आहे. तो म्हणतो—‘ ईश्वराला काय खाऊन टाकूं ? त्या वेदांना काय विष घालूं ? माझ्या गौरवांतील जोर हे कमी करतात.’ **गौरवामाजि**–या अभिमान्याच्या गौरवामधील. **त्राय**—बळ, जोर. **भंगितसे**—मोडून टाकतात,

**कमी** करतात. " गोखा माजि " असा राजवाड्यांचा पाठ स्वीकारून **त्याचा** अर्थ ' कारण हा वेद पठण करणाऱ्याचें बळ घोकण्यामध्यें नष्ट करतो ' **असा** करणें फारसें हृद्य नाहीं.

ओं. २३३. **वाति**–दीपज्योति. **खद्योत**–काजवा. **भानूची खंति**–**सूर्याचा** त्रास, कंटाळा. **कां टिटिभें इ.**—किंवा टिटवीनें ज्याप्रमाणें **समुद्र** आपला वैरी केला. एका टिटवीची पिलें समुद्रानें बुडविली **म्हणून** तिला राग येऊन तिनें आपल्या चोचीनें समुद्राचें पाणी उपसून **काढीन** व आपलीं पिलें मिळवीन असा निश्चय केला. हा तिचा प्रयत्न **हास्यास्पदच** होता. तसेंच गर्वानें जे समर्थांशीं वैर मांडतात, ते हास्यास्पद ठरतात. पहा–' अहो दुरंता बलवद्विरोधिता '–किरातार्जुनीय. ओं. २३४. **सवति जाली**—आपल्या कीर्तीत वेद हे आपणास सवत अथवा प्रति-**स्पर्धी** झाले, अशी त्याची वेडी समजूत असते. ओं. २३५. याप्रमाणें **मानाचा** ज्याला ताठा, तो पक्का महामानी माणूस नरकाचा रुळलेला मार्गच **होय. गंडु**—ताठा ( Complex ). **कुडु**–पक्का. ओं. २३६. आणि **दुसऱ्याचें** सुख पाहण्याचें जर कारण अथवा प्रसंग पडला तर ज्याच्या **मनावर** क्रोधाग्नीचें विष चढतें. येथें ' क्रोध ' या पदावर व्याख्यान **चालू** केलें आहे. **देखणेयाचें**—पाहण्याचें. **मीख**—मिष, कारण.

ओं. २३७. थंड पाण्याच्या संसर्गानें तापलेलें तेल जसें भडकतें, **किंवा** चंद्राचें शुभ्र चांदणें पाहून कोल्हा जसा मनांत जळतो, त्याप्रमाणें **दुसऱ्याचें** सुख ज्याला पाहवत नाहीं. दुसऱ्याला सुखकारक तें ज्याला दुःख-**कारक** तोच क्रोधिष्ट म्हणावयाचा. चंद्राच्या प्रकाशांत कोल्ह्याला उसांची **चोरी** करतां येत नाहीं, म्हणून त्याचा चंद्रावर राग असतो. **शीतळाचिये**–**थंड** पाण्याच्या. **तातला**—तापलेल्या. ओं. २३८. जगाचे व्यापार **ज्याच्या** उदयामुळें प्रकाशित होतात, तो सूर्य सकाळीं उगवला असें पाहून **दुष्ट** घुबडांचे डोळे जातात. त्याप्रमाणें जगाला जें हितकर तें ज्यांना अहि-

तकर होतें. **डुडुळ**—घुबड. दिवसां, घुबडांना दिसत नाहीं. अशा परोत्कर्षासहिष्णु माणसांनाच येथें क्रोधिष्ट असें संबोधलें आहे. **सवळ**—प्रातःकाल. **ओं. २३९.** जगाला जी पहाट सुखदायक होते, तीच चोराला मरणप्राय कष्ट देणारी ठरते. कारण पहाटें चोराला आपलें चौर्य उघकीस येईल ही भीति असते. सापाच्या पोटांत दुधाचें महाविष होतें. **व्याळ**—सर्प. **कालकूट**—विष. पहा—"फणी पीत्वा दुग्धं वमति गरलं दुःसहतरम्।" **ओं. २४०.** आणखी दृष्टांत देतात. 'वडवानळ जितकें म्हणून समुद्राचें पाणी अधिक पीईल, तितका तो अधिकच जळतो, त्याला शांति कधीच मिळत नाहीं. **वडवानळ**—समुद्रांतील अग्नि. हा समुद्राचें जल भक्षण करतो असा संकेत आहे. **ओं. २४१.** 'त्याप्रमाणें दुसऱ्याचें वैभव व भाग्य जसजसा हा पाहतो, तसतसा त्याचा राग दुप्पट होतो. त्या मनःस्थितीलाच क्रोध असें समज.' **ओं. २४२.** आतां 'पारुष्या'वर व्याख्यान करतांना प्रथम अशा कठोर माणसाचें बाह्यस्वरूप वर्णन करतात. 'त्याचें मन म्हणजे सर्पाची जात. जो सर्पाप्रमाणें मनानें दुष्ट. त्याचे डोळे हे जणु बाणांची फेंकच, व त्याचे शब्द म्हणजे जणु निखाऱ्यांचा वर्षाव.' **नारांचांची**—बाणांची. **सूटी**—सुटणें. **ओं. २४३.** यांत त्या कठोर माणसाच्या वागणुकीचें वर्णन देतात. आणि त्याच्या इतर क्रिया म्हणजे पोलादी करवतच जणु. याप्रमाणें त्याचें अंतर्बाह्य कार्य, कठोर किंवा दुसऱ्याचें अंतःकरण कांपणारें असतें. **तिखेयाचे**—पोलादाचे. **घसासित-खसासित** = कांपणारें.

**ओं. २४४. पारुष्य अवतण**—कठोरपणाचा आवतार. **ओं. २४५.** येथून 'अज्ञानाचें' लक्षण सांगतात. ज्याप्रमाणें दगड, थंड व उष्ण स्पर्श यांतील भेद जाणत नाहीं, किंवा जन्मांधाला रात्र व दिवस यांतील फरक समजत नाहीं. **निवाडु**—भेद. **जात्यंधु**—जन्मांध. **ओं. २४६.** भक्षावयास प्रवृत्त झाला असतां, अग्नि जसा, काय खावयाचें व काय

न स्यावयाचें हें जाणत नाहीं, किंवा परीस जसा सोन्याला लोखंडाचा सारखेपणा आहे असें म्हणत बसत नाहीं. त्याच्या मतें सोन्यालोखंडांत भेद नसतोच. **आरोगण**–भक्षण. पहा–' माझेनि हातेविण । देवो न करिति आरोगण ॥ ' उद्धवगीता–१३७. **पाडु**–सादृश्य. **ओं. २४७.** किंवा अनेक रसांत अथवा षड्रसांत बुडूनही पळी जशी एकाही रसाची चव जाणत नाहीं. **रिघौनि**—प्रवेश करून. **दर्वी**—पळी. **ओं. २४८.** किंवा वारा जसा चांगला मार्ग व आडमार्ग हें पाहणारा नव्हे, कसलाही मार्ग असो, वाहणें एवढेंच त्याला ठाऊक. त्याप्रमाणें, चांगलें कृत्य व वाईट कृत्य यांच्या तारतम्यांतील जो आंधळेपणा, त्यालाच अज्ञान म्हणतात.

**ओं. २४९.** हें चांगलें आहे किंवा हें घाणेरडें आहे, हें न समजता लहान मूल ज्याप्रमाणें पाहील ती वस्तु तोंडांत घालतें. **मैळ**—घाणेरडें. **ओं. २५०.** त्याप्रमाणें पापपुण्यांची खिचडी करून खातांना बुद्धीला कडू अथवा मधुर असें न वाटणें, या स्थितीलाच अज्ञान म्हणतात. पापपुण्याच्या खिचडींत कोणती गोष्ट हितकारक व कोणती गोष्ट अहितकारक हें न समजणें, यालाच अज्ञान असें नांव आहे. वर ' अज्ञानाचें विवरण करतांना दिलेले परिस, वारा, लहान मूल, व दर्वी इत्यादि सुष्ट वस्तूंचे दृष्टांत, अनिष्ट वस्तूच्या वर्णनाला मुळींच लागू पडत नाहींत. **खिचटें**–खिचडी. **बुद्धिचेष्टे**—बुद्धीच्या व्यापाराला. **न वटे**—न वाटे. **ओं. २५१.** **साई इ.**–आसुरी सपत्तीच्या साही दोषांचे. **ओं. २५२.** या आसुरी संपत्तीचे सहाच दोष असून देखील ती दांडगी आहे. ज्याप्रमाणें सापाचें अंग लहान असूनही त्याचें विष फार अनर्थकारक असतें. **दोषांगि**-सहा दोषांच्या अंगांनीं. **दाडुगी**—दांडगी, बलाढ्य. **ओं. २५३.** किंवा प्रलयाग्नि, विद्युदग्नि, व वडवाग्नि अशी तीन अग्नींची ओळ पाहतां त्यांची संख्या थोडीच आहे. पण विश्वाची आहुतीही त्यांना पुरेशी होत नाहीं, इतके ते बलाढ्य आहेत. **पांति**– पंक्ति. **पांता**– पाहतां.

**मीति**–संख्या. **ओं. २५४.** ब्रह्मदेवाला शरण गेला, तरी त्रिदोष झालेल्या रोग्याचें मरण टळत नाहीं. त्या तीन दोषांच्या दुप्पट हे आसुरी संपत्तीचे सहा दोष आहेत. **त्रिदोष**–कफ, वात व पित्त. **दूण**–दुप्पट. त्रिदोषांचा जो भयंकर परिणाम व्हावयाचा त्याच्या दुप्पट परिणाम या सहा दोषांचा आहे, असा अर्थ.

**ओं. २५५.** आतां दैवी संपत्तीच्या २६ गुणांच्या मानानें, या आसुरी संपत्तीची रचना केवळ ६ च गुणांनीं झाली, म्हणून कोणी हिला कमी प्रभावी लेखतील, तर तसें नसून ही तशी उपेक्षणीय नाहीं असें सांगतात. **उभारणी**—रचना. **ओं –२५६.** ज्याप्रमाणें एकाच राशीला अनेक दुष्ट ग्रह जमावे, किंवा निंदकाचा पुनः सर्व पातकांनीं आश्रय करावा, त्याप्रमाणें हे सहा दोष या आसुरी संपत्तीला येऊन मिळाले आहेत. **क्रूर ग्रह**– शनि, राहु, केतु व मंगळ, यांना दुष्ट अथवा अशुभ ग्रह म्हणतात. **मांदी**– मंडळी, समुदाय. **राशीं**–मेष वृषभादि कोणत्यातरी राशीला. **निंदकापाशि** इ.–अगोदर निंदक, त्यांत त्यानें आणखी पापें केलेलीं असावी, मग त्याच्या निंदेला केवढा बहर येईल! तशीच ही अगोदर आसुरी संपत्ति, आणि वर या सहा दोषांनीं युक्त, मग केवढा तिचा दुष्ट प्रभाव असेल! **ओं. २५७.** यालाच आणखी दृष्टांत देतात. 'मरणाऱ्या रोग्याच्या अंगावर सर्व रोग आदळावे, किंवा एकाद्या वाईट मुहूर्तावर सर्व कुयोग एकत्र व्हावे, तसेंच या आसुरी संपत्तीचें झालें आहे. **मरणारुवाचे**–मरणाऱ्याचें. **पडिघाति**–पडिघातणें–ताडन करणें. "ज्याप्रमाणें मरणाऱ्यावर सर्व रोगांनीं आघात करावा, किंवा एकाद्या कुमुहूर्तावर सर्व वाईट योग एकत्र यावे." **कुमुहूर्त**–संक्रांत, व्यतिपात असे कुमुहूर्त. **दुर्योग**–दग्धयोग, मृत्युयमघंट इ. कुयोग. **ओं. २५८.**" किंवा एकादी शेळी मरत असतांना, तिला सात नांग्यांची इंगळी चावावी, त्याप्रमाणें या आसुरी संपत्तीला हे

साही दोष प्राप्त झाले आहेत. **सेळिये**– शेळीला. **सातवेडळी**–सात नागांची इंगळी. **मिळे**–डसे. ' अगोदर तारे आणि त्यांत शिरले वारें ' अशीच गत या आसुरी संपत्तीच्या सहा दोषांनीं पछाडलेल्या माणसाची होते, असा अर्थ.

**ओं**. २५९. आपल्यावर विश्वासलेल्या माणसास चोरांच्या तावडींत द्यावा, अगोदरच श्रमलेल्यास महापुरांत ढकलून द्यावा, तशीच या आसुरी संपत्तीच्या दोषांनीं युक्त अशा माणसाची स्थिति होते. **विश्वासला**-विश्वासलेल्यास. **आतुडविजे**–प्राप्त करणें. **सीणला**– शिणलेल्यास. **सुईजे**–घालिजे. **ओं**. २६०. संसारसागरांतून मोक्षमार्गाच्या किनाऱ्याकडे येत असतां, ज्या मुमुक्षूवर आसुरी संपत्तीच्या लाटांचे तुषार उडतात, व मग त्या सागरांतून निघणें त्यास शक्य न होऊन, तो त्या संसारसागरांतच शेवटीं बुडून जातो. मागील ओंवींत पुरांत बुडण्याचें जें रूपक केलें आहे, तेंच या ओंवींत चालू केलें आहे. **आंबुखा पडे**– शिंतोडे उडतात. मनुष्य पोहून तीराला येत असतां, त्याच्या तोंडावर लाटांचे शिंतोडे उडाल्यास तो घाबरून बुडतो. येथें आसुरी संपत्तीचे शिंतोडे मुमुक्षूच्या तोंडावर उडून तो संसारांत बुडतो, त्याला मोक्ष मिळत नाहीं, असा अभिप्राय. **ओं**. २६१. मग अगदी नीच योनीच्या पायऱ्यांनीं उतरत हा संसारी माणूस अशा योनींच्या अगदीं तळच्या पायरीवर येऊन ठेपतो. चौऱ्यांशी लक्ष योनींपैकीं त्याला मृत्युलोकांतील काष्टपाषाणादि योनींत जन्म मिळतो, असा अभिप्राय. **पाउटी**–पायरी. **स्थावरां**– अचल निर्जीव योनींत. त्याला दगडाधोंड्याचा जन्म येतो. **तळवटीं**–खालीं. **बैसणें घे**–बैठक मारतो. **ओं**. २६२. फार काय पण अशा संसारी माणसाच्या ठिकाणीं हे सहा दोष एकत्र होऊन, ते ही आसुरी संपत्ति वाढवितात. **ओं**. २६३. **वेगळाला**–वेगवेगळ्या लक्षणांनीं. या पुढील पांचव्या श्लोकांत दैवासुर संपत्तींचीं अनुक्रमें कार्यें सांगून, अर्जुन दैवीं संपत्तींत जन्मास आला आहे, असें भगवान् त्याला

आश्वासन देतात. (श्लोक पांचवा) **ओं. २६४.पाहाली**—प्रकाश पावलेली. दैवी संपत्ति हा प्रकाश पावलेला उष:कालच. ही संपत्ति मोक्षाला, किंवा मुमुक्षूला संसारांतून सोडविण्यास कारणीभूत होणारी आहे. दैवी संपत्तीनें मोक्षसुखाची पहाट म्हणजे आरंभच होतो, असा अर्थ. **ओं. २६५—मोह—लोहाची** इ. मोहरूपी लोखंडाची सांखळी. ही आसुरी संपत्ति सांखळी प्रमाणेंच मनुष्याला मोहानें संसारांत आडकून पाडते. पहा—"तयां दोघांचें युगुळ जेसी अविद्येची वज्रशांखळ॥"—उद्धवगीता,३०७.**ओं.२६६.**यावरून आपण कोणच्या संपत्तींत जन्मास आलो, याची अर्जुनास शंका येईल म्हणून भगवान् त्याचें समाधान करतात. **झने**—कदाचित्. **कद्रसी**—भिशील, (नामक्रियापद) **कायि रात्रि** इ०—दिवसानें रात्रीचा कधि धाक धरला आहे काय ? त्याप्रमाणें तूंही या आसुरी संपत्तीला भिण्याचें कारण नाहीं. येथें राजवाडे—पाठांत नुसती अक्षरांची गलफत झाली आहे. **ओं. २६७.** जो या सहा-दोषांचा आश्रय करतो, त्यालाच ही आसुरी संपत्ति बंधन-कारक होते. **ओं २६८.** हे अर्जुना! तू तर दैवी गुणांच्या ओलाव्यांत जन्मला आहेस. तेव्हां तुलां काळजी करण्याचें कारण नाहीं. **वोलांवां**—ओलाव्यांत. **ओं. २६९.** म्हणून तूं या दैवी संपत्तीचा स्वामी होऊन, व हे दैवी गुण अधिक आत्मसात् करून घेऊन कैवल्याच्या अथवा मोक्षाच्या सुखास प्राप्त व्हावें. **उवाय**—आनंद.

सहाव्या श्लोकांत दैवी व आसुरी प्रकृतींच्या मनुष्यांचें दोन वर्ग सांगून त्यांपैकीं दैववर्गाच्या माणसांचें पूर्वी वर्णन केलें आहे. आतां आसुरी प्रकृतीच्या लोकांचें वर्णन ऐक, असें श्रीकृष्ण अर्जुनास म्हणतात. (**श्लोक सहावा**) **ओं.२७०.** अशा दोन प्रकारच्या लोकांच्या वागणुकीची प्रसिद्धी अनादिकालपासून आहे. **उजरा**—प्रसिद्धी. **ओं. २७३.** मागें १३ व्या अध्यायाच्या ७–११ या श्लोकांत, 'ज्ञान' म्हणजे काय हें सांगतांना

भगवंतांनीं ज्ञानाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, तींच या सोळाव्या अध्यायांत दैवी संपत्तीचीं म्हणून विस्तारानें सांगितलीं आहेत. **ज्ञानकथनादि-प्रस्तावीं**–ज्ञानकथनाच्या प्रस्तावनेंत. **ओं–२७४. उपलवुं**–उपलविणें–सविस्तर सांगणें. **अवधानाची दीठी**–लक्ष देणारी दृष्टि. **निकी**–चांगली. **ओं. २७५. दुजेन विण**–दुसऱ्या माणसाशिवाय. **शब्दु**–संभाषण. दुसरें कोणी तरी असल्याशिवाय कोणाशीं संभाषण करावयाचें ? पुष्पाशिवाय मध जमा मिळत नाहीं, **ओं. २७६.** त्याप्रमाणें या आसुर प्रकृतीला जोंपर्यंत कोणा शरीराचा आश्रय मिळत नाहीं, तोपर्यंत ती स्पष्टपणें दिसत नाहीं. आसुर प्रकृति एकटी अशी दिसत नाहीं. कोणत्या तरी शरीराच्या आश्रयानेंच ती स्फुट होते. **ओं. २७७.** मग ज्याप्रमाणें अग्नि प्रकट झालेला असा आम्हांला लाकडामुळेंच प्राप्त होतो, त्याप्रमाणें ही आसुरी संपत्ति प्राणिमात्राच्या देहांतच व्यापून राहिलेली आढळते. **आटोपली** —आटोपणें = व्यापणें. **ओं. २७८.** जशी उसाची वाढ, तशी त्याच्या आंतल्या रसाचीही होते. त्याप्रमाणें प्राण्यांच्या देहाच्या वाढीबरोबरच त्यांतील आसुरी संपत्तीचीही वाढ होते. **ओं. २७९.** आतां त्याच आसुर प्रकृतीच्या माणसांचें वर्णन करतात. **रूप करूं**—वर्णन करूं. **दोषवृंदीं**—आसुरीं संपत्तीच्या दोष-समूहानें घडलेलें. सातव्या श्लोकांत याप्रमाणें आसुर प्रकृतीच्या लोकांचा आचारविचार दिला आहे. ( **श्लोक सातवा** ) **ओं –२८०.** पुण्य करावें व पापापासून परावृत्त व्हावें, याबद्दल ज्याच्या मनांत अंधार असतो, ज्यांच्यांत सारासार विचाराचा अंधार, अभाव असतो. **राति**—रात्र, अंधार. **ओं –२८१.** आपल्याच भोंवतीं घर करून आपणासच कोंडून घेणारा किडा ज्याप्रमाणें आपण त्या घरांत शिरण्याच्या आवेशांत त्यांतून बाहेर निघण्याचा कांहींच विचार मनांत आणीत नाहीं, आंतल्याआंत जो

गांजला जातो, त्याप्रमाणें हा आसुर प्रकृतीचा माणूस कार्याकार्यांत आपणांस गुतवून घेतांना, त्यांत आपण गुंतलों कसें व त्यांतून सुटावयाचें कसें, याचा विचारही मनांत आणीत नाहीं. **आवेशा—आवेशांत.** 'आविसा' असा पाठ घेतल्यास, 'जो आपल्या भक्ष्याचाही खाण्यापिण्याचाही विचार मनांत आणीत नाहीं' असा अर्थ होईल. **कोशकारु**—आपल्या भोंवतीं घर करून आपणच आपणांस कोंडून घेणारा एक किडा. **जाचिनला**—दुःख पावला. **ओं. २८२.** आपण पूर्वी दिलेले व पुढें द्यावयाचें असलेलें भांडवल परत येण्याची आशा आहे काय, हें न पाहतां जो मूर्ख तें चोराला कर्जाऊ म्हणून देतो. कोणाकडे आपलें भांडवल गुंतवावयाचें याचा ज्याला विचार नाहीं. सर्वसाधारण अव्यवहारी माणसांचाच अंतर्भाव येथे आसुरी प्रकृतींत केलेला दिसतो. **ओं. २८३.** निर्मळपणा तर त्यांच्या स्वप्नातही नसतो. **ओं. २८४. चोखि—** पांढरेपणा. या ओंवींत सांगितलेल्या अशक्य गोष्टीही घडतील. पण आसुरी माणसांना शुचित्व म्हणून येणार नाहीं. **ओं. २८५. पवित्रत्व इ०**—दारूच्या भांड्याला ज्याप्रमाणे पावित्र्य येणें नाहीं, त्याप्रमाणें त्याना कदापि पावित्र्य येणें शक्य नाहीं. **ओं. २८६.** विधिपूर्वक कर्माची इच्छा, वडिलांनीं अनुसरलेला क्रम व शास्त्रोक्त आचाराची भाषा ते जाणतच नाहींत. **वास**—क्रम, रीति. **भास**—भाषा. **ओं. २८७.** शेळीचे चरणें, वाऱ्याचें धावणें, व अग्नीचें जाळणें जितकें व्यवस्थित तितकेंच यांचें वागणें व्यवस्थित! तें जसें भरमसाट तशीच यांची वागणूकही भरमसाट असा अर्थ. **ओं. २८८. पुढां सूनि**—पुढें सरसावून. ज्यांनीं सत्याशींच नेहमीं दावा मांडलेला असतो. **ओं. २८९.** विंचवाने आपल्या नांगीनें न चावतां नुसत्या गमतीनें गुदगुल्या करणें जितकें शक्य आहे, तितकेंच त्यांनीं सत्य भाषण करणें शक्य आहे. पहिलें जसें अशक्य तसें दुसरेंही अशक्य.

**ओं. २९०.** दुसरा तसाच अशक्य पण थोडा बीभत्स दृष्टांत ज्ञाने-

श्वरांनीं कसा दिला समजत नाहीं. **ओं**. २९१. याप्रमाणें कांहीं न करतां सवरतां जे स्वभावतःच वाईट आहेत. **आता बोलती** इ० आतां या आसुरी लोकांच्या बोलण्याचा म्हणजे विचारसरणीचा प्रकार सांगतात. **नवाई**—चमत्कार. **ओं**. २९२. एरव्हीं उंटाचा खांदा चांगला असतो काय? आणि मग त्याच्या इतर अंगाचें काय? त्याचा जसा खांदा चांगला व इतर अंग वाईट असें म्हणतां येत नाहीं, सर्वच अवयव वाईट, त्याप्रमाणें आसुरी लोक वाईट व त्यांची वाणी तेवढी चांगली असें कसें होईल? त्यांच्याप्रमाणें त्यांची वाणीही वाईटच असणार. **परिस जों**. इ०—आतां प्रसंगानें किंवा विषयानुरोधानें जें आसुर लोकांचें वर्णन आलें आहे, तें ऐक. **कऱ्हें**-उंट. पहा—'अशोकाचे अंगवसे। चघळिले कऱ्हेनि जैसें-' ज्ञाने. ११।४१४. **ओं**. २९३.—धुराड्याचें तोंड धुराचे लोट बाहेर ओकतें, हें लक्षात घेतल्यास, आसुरी लोकांचें भाषण कसें असतें तें चांगलें स्पष्ट होईल. **उधवी**—धुराडें. **उगळण**—ओकणें. **उभड**—लोट.

(**श्लोक आठवा.**) -- हे (आसुरी लोक) सर्व जग असत्य, निराधार, परमेश्वरावांचून असणारें, एकमेकांपासूनही न झालेलें, अतएव मनुष्याच्या विषयोपभोगाखेरीज त्याचा दुसरा हेतु काय असणार, असें म्हणतात. **ओं**. २९४. विश्व हें अनादि असून, त्याचा नियंता ईश्वर आहे, व वेद चावडीवर बसून प्राणिमात्रांच्या न्यायान्यायांचा निवाडा करतात.

**ओं** २९५. वेदांकडून जे अन्यायी ठरतात, त्यांना नरकभोगाची ते शिक्षा देतात. जो न्यायी ठरतो, तो स्वर्गांत जय पावतो. **ओं**. २९६. मागील दोन ओंव्यांत वर्णिलेल्या विश्वाच्या अनादिकालापासून चालत आलेल्या व्यवस्थेला, आसुरी लोक हें सर्व थोतांड आहे असें म्हणतात. **ओं**. २९७. "यज्ञ करण्याच वेड लागलेले, ते नाडले जातात, देववेडे मूर्तिपूजेनें

फसले जातात व भगवीं वस्त्रें धारण करणारे, समाधीच्या भ्रमानें वंचित केले जातात. " तस्मात् या सर्व उपासना फोल आहेत, असा त्यांचा अभिप्राय. **मुसिले**–मुषित झाले, फसले **ओं.** २९८. ' या जगांत आपल्या स्वतःच्या सामर्थ्यानें जें भोगतां येईल, त्याशिवाय दुसरें चांगलें पुण्य आहे काय ? ' येथें आसुरी लोकांची ' पुण्या 'ची व्याख्या दिली असल्यामुळें, ' शून्य ' हा राजवाडे–पाठ अग्राह्य आहे. **ओं**–२९९. ' आपल्या स्वाभाविक अशक्तपणामुळें नव्हे, तर आपणास शक्ती असूनही उपभोगाच्या नवीन वस्तु आपणास आपल्या आटोक्यांत आणतां आल्या नाहींत अशा दुःखाची जी मनाला गांजणूक, तिलाच पाप म्हणतात. ' निरीश्वरवादी लोकांची पापाची ही व्याख्या आहे. **अंगिक**–स्वभाव. **वेगळ**–नवीन वस्तु. **वेटाळी**–आटोक्यांत. **न टके**–प्राप्त होत नाहीं. **गादणें**–पीडा पावणें. **ओं.** ३००. आसुरी लोकांचें म्हणणें आणखी पुढें दिलें आहे. ' श्रीमंतांचे प्राण घेणें हें जर खरोखर पाप आहे, तर त्यांचें सर्वस्व हरण करणें हें त्या मानानें पुण्यकारक आहे, ' आसुरी लोकांची पुण्याची कल्पना येथें दिली आहे. **ओं.** ३०१. बलवान् अशक्ताला खातो हें जर पाप आहे, तर थोरला मासा धाकट्या माशाला खातो म्हणून त्याला पाप लागून त्याचें निसंतान कां रें होत नाहीं ? म्हणून बलवंतानें अशक्ताला खाण्यांत कांहींच पाप नाहीं, उलट हा त्यांचा धर्मच आहे, असें त्यांचें नीतिशास्त्र.

**ओं.** ३०२. आणि प्रजोत्पादनाच्या हेतूनेंच दोन्हीं वधूवराकडील कुळें पाहून सुमुहूर्तावर जर त्यांचें लग्न लावावयाचें तर, **ओं.** ३०३. पशुपक्ष्यांच्या जातींत अगणित संतति होते त्यांचे कोणी विधिपूर्वक विवाह केले आहेत काय ? आसुरी लोकांचे म्हणणें असें कीं, प्रजोत्पादनास मुहूर्तांची किंवा लग्नविधीची कांहीं जरूर नाहीं. या थोतांडावांचून पशुपक्ष्यांना काय मुलें होत नाहींत ? माणसांच्या मागेंच हा विधींचा लकडा कशाला ?

**प्रतिपत्ती**—विधिविधान, विधिपूर्वक. **ओं. ३०४.** चोरीचें द्रव्य चोराला विषाप्रमाणें तात्काळ कधीं बाधक झालें आहे काय? जाराशीं केलेल्या व्यभिचारानें कधीं कोणा स्त्रीला कोड उठलें आहे काय? पापाचें प्रायश्चित्त जर तात्काळ मिळालेलें दिसत नाहीं, तर अशा पापापासून परावृत्त होण्यांत तरी काय हंशील? **वाल्लभाचिये**—वल्लभाच्या, प्रियकराच्या. **रती-**( तृ ) रतीनें. **ओं. ३०५**– ‘ म्हणून ईश्वर जो जगाचा स्वामी, तो पाप्याला धर्माधर्माचीं फळें भोगावयास लावतो, आणि तो ( ईश्वर ) त्या प्राण्याला इहलोकींच्या कर्माचीं फळें स्वर्गांत भोगावयास लावतो.’ हें म्हणणें त्यांच्या मतें फोल आहे. **परत्राचां गावि**—स्वर्गांत. तो ( ईश्वर ) ( त्याला ) भोगी, ( कर्मांची फळें ) भोगणारा करतो, म्हणजे फळें भोगावयास लावतो. **ओं. ३०६.** ‘ परलोकही नाहीं, व देवही नाहीं, ते दिसत नाहींत म्हणून ते खोटे आहेत. आणि कर्ता ( देव ) व त्याचें स्थान ( परलोक ) हेच जर अशारितीनें गेले, तर मग स्वर्गांत जाउन भोगतो कोण?’ तस्मात् ईश्वराच्या व परलोकाच्या कल्पना भ्रममूलक आहेत, असा त्यांचा भाव. **वाव**—व्यर्थ, खोटे. **निमे**—नाहींसा होतो.

**ओं. ३०७.** ज्याप्रमाणें स्वर्गांत उर्वशीबरोबर इंद्र सुखी आहे, तसाच इहलोकीं देखील कृमि मोठ्या ऐटीनें नरकांत लोळतो. इंद्रांत व किड्यांत भेद नाहीं असा अर्थ. **ओं. ३०८.** म्हणून स्वर्ग, नरक हे पापपुण्याच्या वाटणीप्रमाणें मिळत नाहींत. पृथ्वीवर व स्वर्गांत अशा दोन ठिकाणीं कृतकर्मांचा जो भोग सांगितला आहे, तो तर कामशांतीसाटींच होय. **कामाचितव**—कामास्तव, कामासाटींच. कामशांति दोन्ही ठिकाणीं सारखीच. **ओं. ३१०.** आणि आपल्याला लागणारी जी वस्तु आपण मोठ्या आवडीनें मिळवितों तिचा परस्पर द्वेषाच्या द्वारां कामच नाश करतो. प्रत्येकाच्या मनांत लालसा असल्यामुळें, स्पर्धा उत्पन्न होऊन त्या वस्तूचा नाश होतो. **ओं. ३१२. किडाळ**— खोडसाळ ( बोलणें ). **पघळ**—विस्तृत. **सपोल**—

सफोल = निष्फळ, व्यर्थ. " आतां हें खोडसाळ बोलणें पुरे! त्याचा अधिक विस्तार न करणेंच बरें! त्याचें वर्णन करतांना वाणी निष्फळ होते. त्या वर्णनाचा कांहीं फायदा नाही." वरील २९४–३१२ या ओंव्यांत आसुरी लोकांची जी विचारसरणि दिली आहे, ती निरीश्वरवादी चार्वाकाच्या " यावज्जीवं सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत्। भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनः कुतः ॥ " या मताचाच विस्तृत अनुवाद आहे. ज्ञानेश्वरांच्या वरील व्याख्यानांत 'अपरस्परसंभूतं' या पदाचें स्पष्टीकरण, 'स्त्री-पुरुषांच्या युग्मापासून हें जग जन्मे' असें केलें आहे. पण दुसरे टीकाकार " सत्व रज तम या त्रिगुणांच्या परस्पर संयोगानें झालेलें " असा त्याचा अर्थ करतात, हा फरक येथें ध्यानांत ठेवण्यासारखा आहे.

( **श्लोक नववा** )–अशा प्रकारची दृष्टि स्वीकारून अल्पबुद्धीचे नष्ट लोक, घोर कृत्यें करीत जगाचा नाश करण्यास उत्पन्न होतात. **ओं. ३१३. खंती**–( तृ ) त्रासानें. **नसुदिया**—नुमत्या. पहा— " किंबहुना मुख रूपें नसुधा। आस्वादिजे श्लेष्मेयांचा बांधा ॥–उद्धवगीता, ७६३. **चांथी**–बडबड. **हेहि इ०**--आणि ईश्वर नाहीं हाच त्यांच्या मनांत निश्चय कायम असतो. **ओं. ३१४.** फार काय त्यांच्या अगांत पाखांड भरून राहिल्यामुळें, त्यांची जीभ म्हणजे त्यांच्या नास्तिकपणामुळें त्यांना जातिबहिष्कृत केल्याचें चिन्हच होय. **हाड रोवणें**—बहिष्कृत करणें ( महाराष्ट्र शब्दकोश ). पूर्वी एकाद्या विहिरीचें पाणी चातुर्वर्णिकांना निषिद्ध आहे असें दर्शविण्यासाठीं तेथें जवळच हाड रोवून ठेवण्याची चाल होती. **ओं. ३१५. अडदरु**–भय. **ये वासनेचा**—या कल्पनेचा. स्वर्गाचा आदर व नरकाचें भय या कल्पनेचा अंकुरच ज्याच्या मनांतून जळून गेला आहे. **ओं. ३१६.** मग हे सुभटा! अर्जुना! या देहरूपी खोड्यांत अपवित्र पाण्याचा बुडबुडा होत्साते, ते विषयाच्या चिखलांत बुडून जातात. **सुहाड**—बळकट योद्धा. **ओं. ३१७.** अशा लोकांचा जन्म म्हणजे जगाचा नाशच, हें

स्पष्ट करण्यासाठीं दृष्टांत देतात. "पाण्यांतील जलचर कमी करावयाचे झाल्यास जसे धीवर त्या डोहावर जमतात, किंवा मृत्यु यावयाचा झाल्यास जसा रोगांचा उद्भव होतो" **आटणें**—नाहींसें होणें. **शरीर पडणें**—मृत्यु येणें. पहा–"तुझ्या समचि आमुची तनुहि देशकार्यी पडो–" लक्ष्मणशास्त्री लेले. **ओं. ३१८.** जगाच्या वाइटासाटींच धूमकेतूचा उदय होतो, त्याप्रमाणें या आसुरी लोकांच्या जन्मानें, लोकांना त्रास होतो. **ओं.** ३१९. पूर्वीची अशुभ कृत्यें उपटल्यामुळें, त्यांचे फुटलेले जे कोंभ ते हेच. पापाचे हे चालते बोलते कीर्तिस्तंभ होत. **ओं.** ३२०. **विरु**–वैर. वैर करणें हेंच ज्यांना ठाऊक. पहा–"काई माझें घेतलें विरू। कां बोलु बोलिला निष्ठुरु?" उद्धवगीता–७७. **ओं. ३२१. संभ्रम**–आदर. ज्या आदरानें हे आसुरी लोक वरील गोष्टी करतात, त्याचें वर्णन भगवान् दहाव्या श्लोकांत करतात.

(श्लोक दहावा)—आणि कधींच तृप्त न होणाऱ्या विषयोपभोगेच्छेचा आश्रय करून दंभ, मान, व मद यांनीं पछाडलेले हे आसुरी लोक, मोहानें भलभलत्या कल्पना मनांत धरून घाणेरडीं कामें करण्यास प्रवृत्त होतात. **ओं.** ३२२. कोळ्याचें जाळें पाण्यानें कधीच भरून येत नाहीं. अग्नि कितीही सर्पण घातलें तरी तृप्त होत नाहीं, अग्रभागीं त्याचें तोंड नेहमींच अतृप्त राहतें. **जाळ**—जाळें. **धुरें**-धूर = अग्रभाग. **दुर्भर** = तृप्त करण्यास कठीण. रा. आगाशे यांनीं 'धुरें' यांचा 'मस्तीनें डोळ्यांत भरलेल्या धुरानें' असा अर्थ केला आहे तो चिंत्य आहे, व तो येथें लागूं पडत नाहीं. **ओं. ३२३. ओलावा**–आश्रय. **दंभमानाचा इ.** ज्ञानेश्वरांनीं येथें दंभ, मान, या पदांचें अधिक स्पष्टीकरण केलें नाहीं. **ओं.** ३२४. "मातलेल्या हत्तीला पाजलेली दारु अधिक झाली म्हणजे तो जसा जास्तच उन्मत्त होतो, त्याचप्रमाणें या कामी माणसांत मदाचा पारा चढल्यानें होतें. **आगळी**—अधिक. **तव**—आवेश. **जरा**–

कांहींना. या ओंवीला समानार्थक पहा—' आधीच मर्कट तशांतही मद्य प्याला । झाला तशांत जरि वृश्चिकदंश त्याला ॥ झाली तयासि तदनंतर भूतबाधा । चेष्टा वदूं मग किती कपिच्या अगाधा. ॥ " ' तव जरा चढत आंगीं ' यांचें स्पष्टीकरण, ' तोच म्हातारपणाचा आवही त्याच्या अंगीं येतो ' असें रा. आगाश्यांनीं केलें आहे, तें बरोबर वाटत नाहीं. कारण येथें म्हातारपणाचा कांही संबंधच नाहीं. साखऱ्यांचा अर्थही असाच आहे.

**ओं. ३२५.** ' आणि तो आसुर प्रकृतीचा माणूस दुराग्रहाचें आश्रयस्थानच असून, वर पुन: त्याला मूर्खपणासारखा मदतनीस ! मग त्याच्या मनाच्या निश्चयाची स्थिति काय विचारावी ! **आग्रया**-आग्रो-आग्रह = दुराग्रह, हट्ट. **सावाओ**–सावावो=मदतनीस. **निवार्हे**—स्थिति. **ओं. ३२६. परावा**–परका, दुसरा. परका जीव ज्यानें रगडून निघतो. **जन्मव्रती**–जन्मभर ( तसल्या परपीडक कामाचें ) व्रतच घेतलेले. दुसऱ्याला पीडा देणारीं कृत्यें करण्याचें कंकण बांधलेले. तसल्या परपीडक कामांत हे आसुरी लोक प्रवीण झालेले असतात. **ओं. ३२७. आपलें केलें इ०**–आपण केलेल्या कृत्यांचा पुकारा करतात, भरमसाट प्रसिद्धि करतात. **स्पृहाजाळ**–आपल्या आशेचें जाळें. **ओं. ३२८. आटोपें**—व्यापानें. **थोरिये इ०**–आपलीं पापें जे वाढवितात. **धर्मधेनु खुरपे**—धर्मधेनुरूपी खुरपें. देवाला सोडलेली गाय, खुरपें गवत कापत सुटतें, तशी वाटेल तेथें चरत सुटते, तिला कसलाच जसा प्रतिबंध नसतो, तसे हे आसुरी लोक अनन्वित कृत्यें करीत सुटतात. ' धर्मधेनु ' या सारखाच ' धर्मदिवी ' हा शब्द मागें ६५ ओवींत पहा. येथे ' खुरपें ' याचा अर्थ ' बाण ' असा करून " धर्मार्थ मोकळया सोडलेल्या गाईवर टाकलेला बाण जसा घोर पातकास कारणीभूत होतो, त्याप्रमाणें हे आसुरी लोक अशा अभिनिवेशानें घोर पातकें करतात " हा मोडकपारसनीसांनीं दिलेला अर्थ योग्य वाटत नाहीं.

**( श्लोक अकरावा )**—तसेंच आमरण सुखोपभोगाच्या अगणित

चिंतेनें ग्रासलेले, कामोपभोगांत गढून गेलेले व तेंच काय तें सारसर्वस्व असं ठाम मानणारे, ( हे आसुरी लोक ). ओ. ३२९ ते ३३५ या ओंव्यांत आसुरी लोकांच्या उलाढाली वर्णन केल्या आहेत. **ओं. ३२९.** या एकाच डौलानें त्यांची कर्मप्रवृत्ति प्राणापलीकडे चिंता वाहते. **जीणेया परौति**—' प्रलयांताम् ' या पदाचें ज्ञानेश्वरांनीं ' प्राणापलीकडे ' असें केलेलें हें स्पष्टीकरण मुळाला धरून नाहीं. **ओं. ३३०.** ' जी चिंता पाताळापेक्षां खोल, व जिच्या उचीला आकाशही ठेंगणें, जिच्याकडे पाहिलें तर त्रिभुवन अणु इतकेंहि भरणार नाहीं. ' हा त्यांच्या चिंतेचा अफाट विस्तार सांगितला आहे. **निम्न**—खोल. **त्रिभुवन** इ०—त्रिभुवनालाही गवसणी घालणारी त्यांची चिंता. पाताळाहोंनी ( पंचमी ). **ओं ३३१. ते योगपटाची** इ०—या आसुरी लोकांची चिंता म्हणजे योगपटाचें अमर्याद मापच. **योगपट**—अप्राप्य वस्तूच्या प्राप्तीचें वस्त्र. अशा वस्त्राच्या मोजमापाला, जसें ताळतंत्र नाहीं, तशीच त्यांची चिंता बारेमाप असते. **मवणी**—माप, मोजणी. **जिथें** इ०—मनाला अनियमित ध्यास लावणारी. **जे सांडू** इ०—प्रेयसी जशी सोडतां पुरवत नाहीं, तशीच यांना आपली चिंता मरेपर्यंत सोडणें शक्य नसतें. **ओं. ३३२. दिठीं सूनि** इ०-क्षणभंगुर असें विषय आपल्या दृष्टीपुढें ठेवून. असे विषय कोणते त्यांचें पुढील ओंव्यांत वर्णन करतात.

**ओं. ३३४.** ज्याच्यावरून अमृताची कुरवंडी करावी असें स्त्रीच्या सुखाहून दुसरें सुख नाहीं, असा त्यांच्या मनाचा निश्चय झालेला असतो. **ओं. ३३५.** मग त्या स्त्रीभोगासाठीं ते आकाशपाताळ एक करतात, दशदिशा पलीकडेही मजल मारतात. पुढें अशा लोकांचेंच वर्णन चालू आहे.( **श्लोक बारावा** )—अनेक आशापाशांनीं बद्ध झालेले, कामक्रोधपरायण असे हे आसुरी लोक, विषयोपभोगार्थ अन्यायानें पुष्कळ द्रव्य सांठविण्याची हांव धरतात. **ओं. ३३६.** पाण्यांत पडलेला एकच घास

अनेक मासे जसे तोडून नेतात, तसेंच विषयाच्या आशांनीं ज्यांचें मन तोडलें जातें. **ओं.** ३२७. इच्छित तर मिळत नाहींच. **मा रोकडी इ०**— मग आशेची सांखळी—मालिका मात्र तेवढी रोखठोक ठेवलेली. पहा— " आशा नाम मनुष्याणां काचिदाश्चर्यश्रृंखला । " **वाढों वाढों**—ती ( आशा संतति ) वाढून वाढून, अखेर ते आशेंतच गुरफटून बसतात. कोशकीट ज्याप्रमाणें आपल्याच भोंवतीं आपलें घरटें किंवा तंतुजाल निर्माण करतो, त्याप्रमाणें, हे आशेचें जाल आपल्या भोंवतीं निर्माण करतात. कोशकीटाचा दृष्टांत मागें, २८१ ओवींत आला आहे. **ओं.** ३३८. आणि अशा रीतीनें त्यांचा अभिलाष वाढला तरी तो अपूर्णच राहतो, व त्याचें रूपांतर द्वेषांत होतें. आणि मग कामक्रोधाशिवाय दुसरा पुरुषार्थच नाहीं असें त्यांना वाटतें. **ओं.** ३३९. अहोरात्र त्यांना विसावा नाहीं, हें दृष्टांतानें सांगतात. टेवडीवर पाहारा करणारा जसा दिवसा पुढें चालतो, येरझाऱ्या घालतो, व रात्रीं जागरण करतो, त्याप्रमाणें अहोरात्र या आसुरी माणसांना विश्रांति म्हणून नसतेच. **खोलणें**— पुढें चालणें. **जागोवा**— जागरण. **ठाणांतरी**— पाहारा करणारा. ' खोलणें ' या शब्दाच्या अर्थाबद्दल टीकाकारांत बराच मतभेद दिसून येतो. खोलणें म्हणजे दरवाजा उघडणें असा अर्थ रा. आगाशांनीं केला आहे, तर कुंट्यांनीं त्याचा ' मुक्तद्वार ' असा अर्थ केला आहे. साखऱ्यांनीं ' फिरावें लागणें ' असा त्या शब्दाचा अर्थ दिला आहे. पण माडगांवकरांनीं ' पुढें चालविणें ' हा जो अर्थ दिला आहे, तोच बरा दिसतो. कारण दिवसा जो दरवाजा उघडा असतो, तो खोलण्याचें म्हणजे उघडण्याचें कारणच नसतें. पण जो दरवाजा दिवसा उघडा असतो, त्याच्यापुढें पहाऱ्यासाठीं पहारेकऱ्याला येरझाऱ्या घालाव्या लागतात, आणि याच दृष्टीनें त्या शब्दाचा वरील अर्थ युक्त वाटला म्हणून तो स्वीकारला आहे.

**ओं.** ३४०. त्याप्रमाणें कामानें ज्यांना वर उंच नेऊन क्रोधाच्या

टेकडीवर आवटलें आहे, तरी देखील रागद्वेषांच्या प्रेमाला जे पुरेसे होत नाहींत. कामाचा कळस होऊन नंतर ते रागाच्या कह्यांत जातात, व अशा रितीनें रागद्वेष या विकारांची त्यांच्या मनांत वृद्धीच होते. **नेहटणें**–आदळणें. **ढुमें**–ढेम = टेंकडी. **ओं. ३४१.** "अशा रितीनें मनाच्या हांवेनें जरी पुष्कळ विषयवासना कल्पिल्या तरी त्यांचा प्रत्यक्ष उपभोग घेण्यास पैसा पाहिजेच ना !" **अर्थे किं ना इ.**–तरीत्याला पैसा पाहिजे ना? त्याशिवाय विषयोपभोग कसे भोगतां येणार ! **ओं ३४२**–**झोंबति**–लगट करतात. **स्वैरा**–स्वच्छंद. **ओं–३४३.** हे आसुरी लोक जगाला अर्थोत्पादनार्थ कोणत्या उपायांनीं छळतात, त्याचें वर्णन करतात. **सावधां**–सावधगिरीनें. **अपाययंत्रें**–अपाययंत्र, अपाय करणारीं साधनें योजतात. निरनिराळीं शस्त्रास्त्रें निर्माण करतात. **ओं. ३४४.** पारध्यांचीं शिकारीचीं साधनें दिलीं आहेत. पारधी ज्याप्रमाणें आपली साधनें योजतात, त्याप्रमाणें हे आसुरी लोक, लोकांपासून पैसा काढण्यासाठीं निरनिराळे उपाय योजतात. **पाशिकें**–पाशक = पाश. **वागुरा**–जाळें. **सूणें**–कुत्रीं **खोचारा**–खोंचरा = भाला, बरची इत्यादि भोसकण्याची शस्त्रें. **ओं. ३४५.** ते पारधी जसे आपलें पोट जाळण्यासाठीं प्राण्यांचे समूह मारून आणतात, त्याप्रमाणें हे आसुरी लोकही धन मिळविण्यासाठीं तशीच वाईट कृत्यें करतात. **ओं–३४६. तोखणें कैसें**–पण अशा मिळविलेल्या पैशानें तरी त्यांना समाधान कुठचें ! पुढें याच आसुरी लोकांचें मनोगत पुढील दोन श्लोकांत वर्णन केलें आहे.

**( श्लोक तेरावा )**–आज मी हें मिळविलें, उद्या मी तो माझा मनोरथ सिद्ध करीन, आज माझ्याजवळ हें इतकें धन आहे, व उद्यां पुन: तितकेंच मी मिळवीन. **ओं. ३४७. बहुता एकाचिया**–बहुतेकांच्या. **आपुलिया इ०**–आपल्या होतील असें केल्यानें, धन्य झालों ना ! **ओं–३४८. श्लाघो**–प्रौढी. अशी प्रौढी थोडीबहुत कमी होते, तोंच त्यांचें मन आणखी धनासाठीं धांव घेतें. **सवें**–तात्काळ. मग तात्काळ ते म्हणतात, आणखी

घन आणूं " ओं. ३४९. लाभा घेईन– संपादीन. मी मिळविलेल्या भांडवलावर उरलेलें सर्व जग मी आत्मसात् करीन. ओं. ३५०. मग इ०– मग माझ्या दृष्टीच्या टप्प्यांत येईल तें मी कांहीं शिल्लक ठेवणार नाहीं. सर्व आपलेसें करून टाकणार.

( श्लोक चौदावा )–हा शत्रु मी मारला, आणि दुसरेही आणखी मारीन. मी ईश्वर, मीच भोगणारा, मीच सिद्ध, बलाढ्य व सुखी. ओं. ३५१. आणिकहीं इ०—आणखी बलाढ्यांना मी नामोहरम करीन. पवाडें–मोठ्या महत्वानें, कीर्तीनें राहीन. ओं. ३५२. माझें काम करणारे जे चाकर होतील, त्यांवांचून इतरांना मी मारून टाकीन. कामारी–( सं. कर्मकारी ) –काम करणार चाकर. पहा–' कामारी बटिक सेवेचे चाकर '– तुकाराम. ओं. ३५३. मी या मृत्युलोकाचा राजा आहे, सर्व सुखांचें स्थान मीच. म्हणून मला पाहून व माझें ऐश्वर्य पाहून इंद्रही फोल यःकश्चित् ठरतो. वावो होणें—निष्फळ होणें. ओं. ३५४. कें नोहे–काय होणार नाहीं ? सर्वच होईल असा अर्थ. आज्ञासिद्ध-ज्याची आज्ञा सर्व पाळतात असा माझ्याशिवाय दुसरा कोण आहे ? ' सिद्ध ' या मूळ गीतेंतील पदाचा अर्थ ज्ञानेश्वरांनीं ' आज्ञासिद्ध ' आसा केला आहे. वास्तविक ' सर्व सिद्धि प्राप्त झालेला ' असा त्याचा अर्थ व्हावयास पाहिजे. ओं. ३५५. निस्तुल असा मी, जोंपर्यंत दिसलेलो नाहीं, तोंपर्यंतच काळ हा बलवान् असा समजला जाईल. माझें जोंपर्यंत दर्शन घडलेलें नाहीं, तोपर्यंतच काळाच्या सामर्थ्याची थोरवी! निखळ–शुद्ध. आसुरी लोकांच्या बढाईचें आणखी वर्णन ऐकवतात.

(श्लोक पंधरावा)–मी संपन्न व कुलीन, माझ्यासारखा आहे कोण ? मी यज्ञ करीन, दानें देईन, चैन करीन, अशा अज्ञानानें हे लोक मोह पावलेले असतात. ओं. ३५६. आथिला—संपन्न. सोये -सोय=अनुकूलता. मला

असलेली अनुकूल स्थिति त्या कुबेराला ठाउकच नाहीं. **संपत्ति इ.**— संपत्तीनें लक्ष्मीपति श्रीविष्णु देखील माझ्याशीं बरोबरी करणार नाहीं. **ओं. ३५७. उजाळु**-प्रकाश. **ज्ञातिगोत्राचा मेळु**—जात कुळीचा एकंदर समुदाय. **हळु**—हलका. पहा—‘ इयेशीं हळू जाहल्या उंच गेल्या ’— रघुनाथ पंडित. **ओं. ३५८.** ब्रह्मादि ईश्वर, विनाकारण आपल्या नांवांनीं मिरवतात. ते कोणीही माझी बरोबरी करणार नाहींत. **ओं ३५९.** लुप्त झालेल्या जारणमारण प्रयोगांचा आतां मी जीर्णोद्धार करीन. शिवाय वर आणखी परपीडक यज्ञांची मी स्थापना करीन. **अभिचारु**—जारणमारण विद्या. **परमारु**-परपीडा. **ओं. ३६०. नटे**—हावभावांनीं. **ओं. ३६१. माजिरां**—मादक. मादक खाद्यपेयांनीं मी चैन करीन. **आसुर प्रकृतिपिसें**— आसुरी स्वभावानें वेडे झालेले. **गगनौळेयां**—आकाशपुष्पांच्या माळांचा पुष्कळ वास घेतात. शेखमहम्मदी राज्य मनांत उभारतात. **तुरंबणे**— वास घेणें. मागें. ३९ ओंवी पहा.—“ तरी स्वतरंगाचीं मुकुळें । तुरंबु कां पाणी ॥ अमृतानुभव-१।५९. **असोसे**—पुष्कळ. पहा— झाडोंझाडीं फुलें असोंस । परि नाहीं मुक्ताफळांचे घोंसे ॥ उद्धवगीता, ५१७. **गगनौ-ळिया**—गगनौळ—आकाशपुष्प. पहा—नाना गगनौळिचिया माळा। वांझेच्चिया झालिया गळां । —अमृतानुभव ७।८२.

( **श्लोक सोळावा** )—अनेक प्रकारच्या कल्पनांनीं भ्रांत झालेले, मोहाच्या जाळ्यांत सांपडलेले, विषयोभोगांत गढून गेलेले, हे आसुरी लोक घाणेरड्या नरकांत पडतात. **ओं. ३६३.** येथें एक रूपक साधलें आहे. आज्ञानाच्या धुळीनें व्यापलेली आशारूपी वावटळ, मनोरथाच्या आकाशांत हे फिरवितात. हे आसुर लोक आपल्या मनांत अज्ञानानें नाहीं नाहीं त्या आशा धरतात असा अभिप्राय. **आंतणे**—व्यापणें. **ओं. ३६४. जराचेनि**—ज्वराच्या. **आटोप**—सामर्थ्य, जोर. **भलतैसे**—भरमसाट. **चंचळित**—चांवळणे = बड-

बडणें. त्याप्रमाणें, आसुरी लोक हव्या त्या कल्पनेनें बडबडतात. **जाण**–हें पार्था ! तूं हें समज. **ओं. ३६५. अनिम**–अमर्याद. आमर्यादपणें वृष्टि करणाऱ्या आषाढांतील मेघांप्रमाणें, किंवा निरंतर असणाऱ्या समुद्राच्या लाटांप्रमाणें, हे आसुरी लोक आमर्याद व निरंतर कामेच्छा धरीत असतात. **अभंग**–निरंतर असणारी. **ओं.** ३६६. मग त्यांच्या कामनारूपी वेलीचे फांटे मनांत पसरल्यावर, काठ्यांनं कमळें ओरबडलीं असतां तीं जशी फाटून जातात, तशा त्या मनोरथरूपी वेली तुटून जातात. त्यांचे मनोरथ विलय पावतात. **जिवीं**–मनांत. **वेलरिया**–वेलरी = वेलीचे फांटे. **वोरपिलीं**–ओरपणें–ओरबडणें. या ओवींच्या उत्तरार्धाशीं समानार्थक पहा–' काठ्यां-वरि घालितां चिरे पट कीं '–मोरोपंत–उत्तरगोग्रहण.

**ओं.** ३६७. किंवा हे पार्था ! दगडावर आपटलेलें भांडें जसें फुटतें, त्याप्रमाणें त्यांच्या मनोरथांचा मनांत चक्काचूर होतो. **जीविं कूट झाले**–मनांत चूर होतात. **ओं.** ३६८. रात्र वाढूं लागेल तसा अंधःकारही वाढूं लागतो, तद्वत् त्यांच्या मनांत मोह वाढूं लागतो. **रयणी**–रजनी = रात्र. **पुरवणी**–भर. **ओं.** ३६९. आणि जसजसा मोह वाढतो, तसतसी विषयेच्छाही वाढते व मग जेथें विषय तेथें पातक ठेवलेलेंच. **रोहो**–वाढ. **विपय तेथ** इ०–जेथें विषय तेथें पातक ठरलेलेंच. **ओं.** ३७०, ' आपल्या पापांच्या बळानें, जों जों हे जन्मामागून जन्म घेतात, तों तों हे जिवंतपणींच नरकाला जातात. कारण पापें बळावलीं असतां यांना जन्म घ्यावाच लागतो. **थावें**–बळें, **यंति**–( संस्कृत ) = जातात. **ओं.** ३७२. यांत नरकाचें वर्णन आलें आहे. ' जेथें तरवारीच्या पानाचे वृक्ष, खदिराच्या निखाऱ्याचे धगधगीत डोंगर, तप्त तेलाचे समुद्र, उतूं आलेले असतात. **उततातीं**–उतणें–बाहेर सांडणें. **ओं.** ३७३. याप्रमाणें यातनांची रांग लागली म्हणजे, ते वैतरणी नदींतून जाऊन भयंकर नरकांत

पडतात. **वैतरणी**-यमलोकांतली किंवा नरकांतली नदी. पापी प्राण्याला मरणोत्तर ही ओलांडावी लागते.

**ओं.** ३७४. याप्रमाणें नरकाच्या उत्तम वाट्याचे विभागी होऊन जे जन्मास आले आहेत त्यांची ही गोष्ट झाली. शिवाय जे यज्ञ करतात, ते देखील वंचित झालेलेच दिसतात. पुढील १७ व्या श्लोकांतील ' यजंते ' याशीं, ' जैत ' या पाठापेक्षां ' यजिती ' हा पाठच अधिक जुळतो. **सेल**--उत्तम- वांटा. पहा--" लघुत्वाचेनि मुदले । बैसला गुरुत्वाचे सेलें ॥ "-अमृतानुभव २।२०. (**श्लोक सतरावा**)-आत्मश्लाघी ताठर व धन,मान आणि मद यांनीं युक्त असलेले हे (आसुरी लोक), दांभिकपणानें विधिबाह्य प्रकारानें केवळ नांवचे यज्ञ करतात. **ओं.** ३७५. येरव्ही यज्ञयागादि क्रिया या आसुरी लोकांना घातकच असतात; पण नाटकी लोकांप्रमाणें हे त्यांचें आचरण करून विफळ होतात, त्यांचें व्यर्थ आचरण करतात. यज्ञयागादि आचरणाचा हे आसुरी लोक नुसता पोकळ डौल आणतात. येथें आगशांचा अर्थ बरोबर नाहीं. **आहाणा**—घातक. पहा-" एवं ज्ञाता ज्ञान दोनी। इयें पोटीं सूनि आहाणी। उदेला चिद्गगनीं । चिदादित्य हा ॥ " -अमृतानुभव-८।१९. **ओं.** ३७६. आपल्या प्रियकराचें महत्व आपणास चिकटवून घेऊन वेश्या किंवा जारिणी स्त्रिया, ज्याप्रमाणें सौभाग्यानें स्वतःस संतोषित करतात, त्या विकतच्या सौभाग्यांत जशा आनंद मानतात, तसे हे आसुरी लोक यज्ञायागाच्या आचरणानें आपण खोटा मोठेपणा उपभोगतात. **उजरी**-महत्व. " तुका म्हणे कई भाग्याची उजरी । होईल पंढरी देखावया ॥-" तुकाराम. पहा—उजरिया – उज्रंभिया-" तंव उजरिया केलें दैवाचिआ तें परिसा पां—" ऋद्धिपूरवर्णन, ४३. **अहेव**— ( अविधवा ) = सुवासिनी.

ओं. ३७७. **महंतपण**—साधुत्व. मोठेपण. **ओं. ३७८. लवों नेणती** - ज्यांना विनय ठाउकच नाहीं, नेहमीं ताठ्यांत. **आटीव**—ओतीव लोखडाचे, बिडाचे, न वाकणारे. **उधवली**—उधवणें – वर जाणें. **शिळाराशि**—डोंगराचा सुळका. **ओं.** ३७९. त्याप्रमाणें हे आपल्याच शोभेनें अथवा ऐश्वर्यानें आपणच खूष होतात व इतरा सर्वांना गवताहूनही तुच्छ लेखतात. **बरव**—शोभा, सौंदर्य. पहा " भरी तन्मात्राची लोव । ले विषयांचें ढीग । ते अवगती बरव । तोचि जाणे ॥ उद्धवगीता- ६०३. **ओं.** ३८०. **धनाचिया इ.**—धनाच्या मदानें. **कृत्याकृत्यविचारा**—कृत्याकृत्याच्या विचारापासून. **सवते केलें**—जे पारखे झालेले आहेत. **ओं.** ३८१. **आइति**— डौल. **तेथ**—इ. तेथें यज्ञाची काय कथा ? **तऱ्ही इ.**—ही वेडीं काय काय म्हणून करणार नाहींत ! सर्व कांही करतील असा भाव. **ओं. ३८२. मौढ्यमदाचेनि बळें**—मूर्खपणा व गर्व यांच्या जोरावर. **टवाळें.**—नक्कल. यज्ञाची नुसती नक्कल करतात.

ओं ३८३. त्यांना कुंडाची मंडपाची किंवा वेदीची कशाचीच जरूरी नसते. **वेदी**—यज्ञाचा ओटा. **आणि तेयासी इ.** आणि त्यांचा व शास्त्रविधींचा तर उभा दावाच असतो. **दंद**—द्वंद्व = भांडण. **ओं.** ३८४. देव ब्राह्मणांची नांवेंच काय पण, **तेउते इ.**—तिकडचा वारा देखील नको. **ऐसे तेथ इ.** असें असल्यावर तेथें कोणाला काय द्यावें लागणार ? देवा-ब्राह्मणांचे जेथें नांव नको, तेथें दानधर्माचें तरी नांव कोठलें ! **ओं ३८५.** वासरूं मेलेल्या अशा गाईपुढें पेंढा भरलेलें वासरूं ठेऊन शहाणे लोक ज्याप्रमाणें तिचें दूध काढून घेतात. **उगाणा**—झाडा. ' नाणी कांहीं मना । करुनि पापाचा उगाणा ' ॥ —तुकाराम. **भोकसा**—पेंढा भरलेले मृत जनावर. पहा—" थबथबिवा मांसा । घातला चामाचा भोकसा " ॥— उद्धवगीता—७५८. **ओं. ३८६. जगा वाउनि हांवे**—जगाला नसती आशा

उत्पन्न करुन. **ऐहेरा वाऱ्ही**–अहेरावारी जगाला नागवतात. हे यज्ञ करतात म्हणून जग यांना अहेर करतें. पण या आसुर लोकांना काय तेवढाच अहेर आला ! त्या द्वारां देखील जगाला ते बुचाडतात. **ओं. ३८७.** ' याप्रमाणें आपल्या मोठेपणासाठीं जे यज्ञ करतात, ते त्या द्वारां जगाच्या सर्व नाशाचीच इच्छा धरतात. **उजरी**–पहा मागें ओं. ३७६.

**( श्लोक आठरावा )**–अहंकार, बल, दर्प, काम व क्रोध यांनीं भरलेले हे निंदक, त्यांच्या स्वतःच्या व इतरांच्या देहांत असणाऱ्या त्या माझा-परमेश्वराचा–द्वेष करतात. **ओं**, ३८८. मग आपल्यापुढें नगारे, डंका, लावून हे आसुरी लोक आपल्या दीक्षितपणाचा व्यर्थ गाजावाजा करतात. **भेरी**–नगारा. **निसाण**–डंका. पहा " घाव घातला निशाणीं "–रुक्मिणी-स्वयंवर–एकनाथ. **दीक्षितपण**—यज्ञ केल्याचा मोठेपणा. **फोकरीति**–पहा मागें ओंव्या २२१, ३२७. **आण**–शपथ. अर्जुना ! मी शपथपूर्वक सांगतो कीं, हें सर्व वायों–व्यर्थ आहे. **ओं. ३८९. सगरवा**–मूळच्याच त्या गर्विष्ठाला मोठेपणाचा आव, येतो. **जैसे इ०**–ज्याप्रमाणें अंधाराला काजळाचा लेप दिला असतां जशी त्याच्या काळेपणांत अधिकच भर पडेल, त्याप्रमाणें मूळच्या त्याच्या गर्विष्टपणांत दीक्षितपणाच्या आढ्यतेची भर पडते. दुर्गुणांत आणखी दुर्गुणांची भर. **लेवे**–लेवा = लेप.

**ओ. ३९०. मौढ्य**–मूर्खपणा. **घणावे**–घणावणें–दृढ होणें. **दुणावे**–दुप्पट होणें. **औद्धत्य**–उद्धटपणा. **ओं. ३९१.** " मग सामर्थ्यात आपल्या–पुढें दुसऱ्याचें निखालस नांवही निघू नये म्हणून, त्यांच्या दांडगेपणाला विशेषच जोर चढतो. **भाक**–भाषा, नांव. **ओं. ३९२. एकवळा**–एकोपा. याप्रमाणें त्यांच्या अहंकाराचा व बळाचा एकोपा झाल्यावर, त्यांच्या गर्वाचा सागर आपली मर्यादा सोडून बाहेर पडतो. अहंकार बळावल्यावर

त्यांच्या गर्वालाही कांहीं मर्यादा रहात नाहीं. तो मार्यादा सोडून बाहेर येतो. **वेळा**—समुद्राची मर्यादा. **उते**—उतणें. पहा मागें ओं. ३७२. **ओं.** ३९३. **पीत्त कुरुपे**—पित्त चढतें, पित्तक्षोभ होतो. दर्प वाढला कीं, काम वाढलाच. **तया इ०**—त्या कामानें क्रोधाग्नीची आग सैरावैरा पेटते. **पळिपणे**—पेटणें. पहा—ध्यायतो विषयान्पुंस: संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥ गीता, अध्याय २. **ओं.** ३९४. ऐन उन्हाळ्यांत तेलातुपाच्या कोठाराला आग लागावी व त्यांत आणखी वाराही सुटावा म्हणजे जसें होईल,

**ओं.** ३९५. त्याप्रमाणें अहंकार बळावून गर्वही कामक्रोधांतून उत्पन्न झाल्यावर, या दोहोंचा मिलाफ या आसुरी लोकाच्या अंगीं होतो. **रूढणें**—उत्पन्न होणें. **ओं.** ३९६. आणि असा मेळावा झाल्यावर मग कोणत्या प्राण्यांची यथेष्ट हिंसा ते करणार नाहींत बरें! **वीरेशा**—वीरश्रेष्ठा अर्जुना! **ओं.** ३९७. प्रथमत: हे आसुरी लोक जारणमारणादि क्रियांसाठीं आपल्या अंगचें मांस व रक्त खर्ची घालतात. **वेचु**—खर्च. **अभिचार**—मागें ओं. ३५९ पहा. **ओं** ३९८. अशा रितीनें आपलेच देह जाळीत असतां, त्या देहांत असणाऱ्या माझ्यावर—आत्म्यावर—ते घाव घालतात. **घाए**—घाव. **वाजणे**—आदळणें, लागणें. **ओं.** ३९९. आणि हे जारणमरण करणारे लोक जेवढ्यांना पीडा देतात, तेवढ्यांत असणाऱ्या मला म्हणजे जीव चैतन्यालाच हा त्रास पोंचतो असें हे अर्जुना! तूं समज. **सीणु पावे**—दुःख, किंवा श्रम होतात. **ओं.** ४००. या आसुरी लोकांच्या जारणमारणाच्या पकडींतून जे लोक कदाचित् सुटतात, ते त्यांच्या दुष्टपणाच्या वेटाळयांत सांपडतात. **त्रिपाये**—कदाचित्. पहा मागें ओं. १४४. **अवगळणें**—सुटणें. **टाकीति**—पावती, प्राप्त होती. **टाकणें**—प्राप्त करणें, मिळणें. पहा—“ **झोंबौनि वैराग्याचा कडा। टाकी ज्ञानदुर्गाचा हुडा ॥ १९० ॥** उद्धवगीता. “ **संकोचलीं कमळें ।**

पक्षिये टाकिती अविसाळें ॥ चक्रवाकें होती व्याकुळें । वीयोगें प्रियाचेनि ॥ ४७६ ॥—नरेंद्ररुक्मिणीस्वयंवर. **एटाळी**–वेटाळी. येथें पारसनीस-मोडकांचा अर्थ योग्य नाहीं.

ओं. ४०१. **सतिया**—सत्या, पतिव्रता. **ओं. ४०२.** भक्त, महात्मे हे आपलींच आश्रयस्थानें आहेत असे भगवान् सांगतात. भक्तांच्या ठिकाणीं भगवंताचा अधिवास असतो. **निर्वाळिलीं**–निर्मळ झालेलीं. हीं भक्तादिकांचीं विशाळ हृदयें श्रुतिप्रणीत होमधर्मांनीं निर्मळ झालेलीं असतात. या भक्तादिकांनीं वेदविहित यज्ञादिकर्में केलीं असल्यामुळे, त्यांचीं अंतः-करणें स्वच्छ, अज्ञानरहित झालेलीं असतात. **ह्मन**—निश्चयपूर्वक. **ओं. ४०३.** असा माझ्या भक्तादिकांवर हे आसुरी लोक आपल्या अपशब्दाचे बळकट व निगरट बाण, द्वेषाच्या विषांत घोळून सोडतात. **कांडें**–बाण. **सदटें**–बळकट. **घासटणें**—विषांत घोळणें. पहा मागे, ओं. २१५. **सिंथिति**—सिंचिती–सोडिती, फेकतात. द्वेषयुक्त अपशब्दांचा भडिमार करतात. अशा आसुरी लोकांचें आपण कसें पारिपत्य करतों तें श्रीकृष्ण पुढील श्लोकांत सांगतात.

( **श्लोक एकोणिसावा** )—या क्रूर, द्वेष्ट्या व कुकर्म करणाऱ्या नराधमाना मी या ससारातील पाप योनींतच नेहमीं टाकतों, जन्मास घालतों. **ओं. ४०५.**–'तरी मनुष्यदेहाचा आश्रय करून जे जगाचा द्वेष करतात, त्यांची ही मनुष्य पदवी काढून घेऊन मी त्यांना याप्रमाणें ठेवतों. **जगा-रुसति**–जगांतील आपलें कर्तव्य विसरतात, जगाचा द्वेष करतात. **तागा**—आश्रय. **पदवी**–मनुष्यपद. **ओं. ४०६.** ' जी तमोयोनि क्लेशरूपीं गांवाचा उकिरडा आहे, व संसारपुरीचा पाणोटा आहे, ती या दुष्ट आसुरी माणसाला मी वतन देतो. जी तमोयोनि उकिरड्यासारखी घाण व क्लेश वाढविणारी आहे, व जेथें संसार कोणालाही सुटणें शक्य नाहीं, अशा नीच योनींत मी

( श्रीकृष्ण ) त्याला उपजीविका देतो. **वृत्ति**—वतन, उपजीविका. **ओं.** ४०७. मग खाण्याच्या नांवानें जेथें गवतही उगवत नाहीं, अशा अरण्यांत मी त्यांना वाघ, लांडगे करतों. **आडवें**—( अडव ) = अरण्यांत. **ओं.** ४०८. तेथें भुकेच्या पीडेनें स्वतःलाच तोडून खांत असतांना. **मरों मरों** इ०—मरून मरून पुनः पुनः जन्मास येतात. एका वाईट योनीं-तून दुसऱ्या अधिक वाईट योनींत जन्मास येतात. **ओं.** ४०९. किंवा आपल्याच विषाच्या ज्वाळांनीं आपल्याच अंगाची वेटोळीं भाजणारे बिळांत अडकलेले असे सर्पच मी त्यांना [ आसुरी लोकांना ] करतो. **वेंढळी**—वेटाळीं. **जिरुंधला**—अडकलेला. **ओं.**—४१०. पण एकदा श्वास घेऊन पुनः तो घेतला जाईपर्यंत, मधल्या वेळांतला एवढाच अगदी अल्पकालीन विसांवा मिळाला तर त्यांना हे अर्जुना! मिळतो. **घाप**—घेतला जातो [ कर्मणि प्रयोग ]. **लिंपे**—चिकटतो, मिळतो. त्यांना आपण थोडीं देखील विश्रांति मिळूं देत नाहीं, असें श्रीकृष्ण म्हणतात.

**ओं.** ४११. असे कोटी कल्प गेले, तरी तो काळ थोडाच समजून तेवढ्या काळांत मी त्यांना त्या क्लेशांतून बाहेर काढीत नाहीं. **ओं.** ४१२. तरी त्यांना शेवटीं जेथें जावयाचें असतें, त्या रस्त्यावरचा हा पहिला मुक्काम होय. **पेणें**—मुक्काम, टप्पा. **तेयाहुनि** इ०—मग शेवटीं त्याहून देखील भयंकर अशीं दुःखें त्यांना प्राप्त होणार नाहींत काय?

**(श्लोक विसावा)** 'हे कुंतिपुत्रा! अर्जुना! याप्रमाणें जन्मोंजन्मीं आसुरी योनीच प्राप्त झाल्यामुळें, हे मूर्ख लोक माझ्याकडे कधींच न येतां शेवटीं अत्यंत अधोगतीला जातात.' **ओं.** ४१३. अशाप्रकारें त्यांनीं मिळविलेल्या भयंकर अशा आसुरी संपत्तीनें ते कशी अधोगति प्राप्त करून घेतात तें ऐक." **ओं.** ४१४. व्याघ्रादि तामस योनींच्या मागें जो देहाधाराचा थोडासा विसावा आहे. **अळुमाळु**—थोडा. पहा—" तें सांघतां दुआड। आईकतां अवघड।

तऱ्हीं अळुमाळ उवड। सांघेन तुज "॥–उद्धवगीता-७९३. **उसासा**–विसावा. व्याघ्रादि योनींत कोणता तरी देह धारण करावा लागत असल्यामुळें, तें एक विसाव्याचें साधन असतें. पण तेंही या आसुरी लोकांपासून आपण काढून घेतो, असें पुढील ओंवींत भगवान् सांगतात. **आथि**–अस्ति–आहे. **ओं. ४१५.** तो देहाधाराचा आश्रय देखील मी हिरावून घेतो. मग देहहीन अशा स्थितींत गेल्यावर ते एकदम अंधकारमय होतात व तेथील अंधारानें काळे होतात. **तेथ**–देहहीन स्थितींत. **एकसरे**–एकदम. **काळवंडणें**–काळे होणें. **बोलावा**–आश्रय. **ओं. ४१६.**– ज्या तामस योनीच्या चिळसाची नरक देखील भीति घेतो, जिच्यांतील कष्टानें, कष्टाला देखील मूर्च्छा यावी. **विवसी घेणें**–भय घेणें. पहा–" शिव ! शिव !! कदनाची विवसी संसारी। कवणु नेघे ! "–उद्धवगीता–२२९. **मूसी**–मूर्च्छेला. **ओं. ४१७.** जिच्यामुळें मळ देखील घाणेरडा होतो, दुःखाला देखील चटके बसतात, व जिचें नांव घेतलें असतां, महाभय देखील भयभीत होतें. **मैळे**–मळे. **ताप**–दुःख. **सळे**–सळणें = भयभीत होणें. ज्या गोष्टी दुसऱ्यांना दुःखद अगर भयप्रद आहेत त्यांनींच जिला पाहून भ्यावे, अथवा दुःखी व्हावें, अशा या तामस योनीचें स्वरूप किती हिडिस असेल ! **ओं. ४१८.**–जगांतील ज्या वाईट व अधम अशा योनी आहेत, त्या तामस योनी यांना भोगाव्या लागतात. **वोखट्या**–वाईट.

**ओं. ४१९.** या योनींचें वर्णन करणें किंवा नुसतें स्मरण करणें, केवढें दुःखकारक आहे तें सांगतात. " हें सांगतांना वाचेला रडें येतें, त्यांचें स्मरण करतांना मन मागें हटतें, अहाहा ! या मूर्ख आसुर लोकांनीं केवढा नरक जोंडला हा ! **खिरडे**–खिरडणें = मागें सरणें, हटणें. **कट**–कटा किंवा कटकटा = हाय ! हाय ! पहा–' बोलिली कटकटा जनवाणी '–भरतभाव–वामनपंडित **ओं. ४२०. काइसेया**–कशासाठीं. **वाउर**–वाईट. **ओं. ४२१.**

मोहरा–समोर. जेथें या आसुरी संपत्तीच्या लोकांचें राहणें आहे, तिकडे ढुंकून देखील पाहूं नको. जेउता–जेथे या आसुरी संपत्तीच्या लोकांचा रहिवास आहे तिकडे. ओं ४२२. आणि हे दंभादि सहा दोष ज्या आसुरी संपत्तीच्या ठिकाणीं आहेत, ती त्यजावी हें काय सांगावयाला पाहिजे ? आसुरी लोकांचें व त्यांना मिळणाऱ्या गतीचें येथपर्यंत वर्णन झालें. आतां या तामस योनींतून सुटण्याचा मार्ग पुढील श्लोकांत सांगतात.

( श्लोक एकविसावा )–काम, क्रोध व लोभ असे तीन प्रकारचें नरकाचें द्वार असून, तें आपला नाश करणारें आहे. म्हणून या तिहींचा त्याग करावा. ओं. ४२३. थोंब–समुदाय ( सं–स्तोम ). थांवें–थावणें = बळावणें. तेथें अशुभाचें पीक पिकलेंच म्हणून समज. ओं. ४२४. वाटेल त्या माणसास आपल्या सर्व दुःखांचें दर्शन घडविणारे हे ( तीन दोष ) मार्गदर्शक, वाटाडे म्हणून दिले आहेत. हेच तिघे कोणालाही वाईट मार्गास लावतात. ‘ भलेया ’ पेक्षां ‘ भलतेया ’ हा शब्द अर्थाच्या दृष्टीनें अधिक व्यापक आहे, म्हणून तोच पाठांत स्वीकारला आहे. पाढाउ–मार्गदर्शक, वाटाडी. ओं. ४२५–सुवावेया–घालण्यास. दादुगी–दांडगी. या तीन दोषांची ही बलाढ्य सभाच होय. ओं. ४२६. जोंपर्यंत काम, क्रोध व लोभ हे तीन, मनांत उचल खात नाहींत तोंपर्यंतच पडद्यामागें कोठेतरी रौरव नांवाच्या नरकाचें नांव ऐकलें जाईल. हे तीन उदय पावल्यावर यांच्यापुढें रौरवाची काय कथा ? दुष्ट फलें देण्यांत हे रौरवालाही मागें सारणारे आहेत. अपटांतरीं—पडद्यामागें.

ओं. ४२७. यांच्यामुळें नाश अगदीं सहज आहे, यांच्यामुळें होणाऱ्या यातना नऊपट आहेत, व हानि म्हणतात ती खरी हानि नसून हे तीन दोषच हानि होंत. आसलग–सोपा. पहा— “ तापसपणें विलागु । अग्नि नव्हे असळगु ॥ उद्धवगीता–२८५. सवर्ग–तिहींचा वर्ग, $३^३=३\times३\times३=९$ पट. ओं. ४२८. दारवठा–उंबरठा. त्रिशंकु–तीन खिळे मार-

लेला. काम, क्रोध, लोभ हे तीन खिळे, यांच्यापासुनच नरकांत प्रवेश. **ओं. ४२९ जीवें**—मनानें.-**निरयपुरीची**—नरकलोकाची. **ओं. ४३०. त्रिपुटी**—तीन दोषांचें हे त्रिकूट. **आघवा विखीं**—सर्व विषयांत, सर्व बाबतींत.

( **श्लोक बाविसावा** )—हे कौंतेया ! या तीन तमोद्वारांतून सुटला म्हणजे मनुष्य स्वतःला कल्याणप्रद अशा गोष्टीचेंच आचरण करतो, व मग उत्तम गतीला जातो. **ओं.** ४३१. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांपैकीं, कोणताही एक मिळविण्याची गोष्ट तेव्हांच काढतां येईल, कीं, जेव्हां या त्रिकुटाचा समुदाय सोडला जाईल. **मातु**—गोष्ट ( कानडी ). या तिघांच्या पुढें कोणत्याही पुरुषार्थाचें नांवच नको. **सांघात**—समुदाय. **ओं.** ४३२. काम, क्रोध, व लोभ हे तीन मनांत जागृत असणें आणि कल्याणाची प्राप्ति होणें, या परस्पर विरुद्ध गोष्टीं माझ्या कानांनीं तरी ऐकलेल्याच नाहींत. त्या इतक्या असंभवनीय आहेत कीं, त्या ऐकायला येणें शक्यच नाहीं, असें श्रीकृष्ण म्हणतात.

**ओं.** ४३३. ज्याला आपलें हित प्रिय आहे, आत्मनाशाला जो भितो, त्यानें या तिघांची संगत धरूं नये. **आपणपें**—आत्मस्वरूप. **पढिये**—प्रिय. **सोय धरणे**—आश्रय करणें. **ओं.** ४३४. यांची संगत म्हणजे पोटाला शिळा बांधून समुद्रांत बाहूंची शक्ति दाखविणें, किंवा जगण्यासाठीं विषाचें भोजन करण्यासारखें आहे. **बाहीं**—बाहूंनीं. **आंगवण**—शक्ति. वरील गोष्टीं जशा मारक, तशीच यांची संगत मारक. या ओंवीला समानार्थक पहा— ' कंठीं बांधूनि शिळा बाहुबळें सागराशि तरशील "—मोरोपंत. **ओं.** ४३५. वर सांगितल्याप्रमाणें या कामक्रोधलोभांनीं मारक कार्यें घडून येतात. **ठावोचि पूसीं**—यांचा मागमूसच पुसून टाक, नष्ट कर. **ओं.** ४३६. ज्यावेळीं अकस्मात् ही ( कामक्रोधलोभांची ) तीन कड्यांची सांखळी तुटेल, त्यावेळीं प्राण्याला आपल्या कल्याणाच्या वाटेनें

सुखानें जातां येईल. ओं. ४३७. कफ, वात, पित्त या त्रिदोषांनीं मुक्त झालेलें शरीर; चोरी, चहाडी व शिंदळकी, या त्रिकुटीनें मुक्त झालेलें गांव; व आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध तापांपासून मुक्त झालेलें मन जसें सुखी होतें, तद्वतच कामक्रोध व लोभ या त्रिकुटानें सोडलेला मनुष्यप्राणि जगांत सुखी होईल.

ओं. ४३९. मग प्रबळ संतसगानें व सच्छास्त्रांच्या सामर्थ्यानें जन्ममृत्यूंची अवघड अरण्यें तो ओलांडून जातो. **जन्ममृत्यु** इ०—जन्ममृत्यूची अडचणीचीं रानें हा उल्लंघून जातो. **निमाळ**—खचरट, अडचणीचीं. जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटतो असा अर्थ. पहा—" कीं निम्हाळ संसारवाटेची विश्रामुशाळा । आर्तजनां लागी "—शिशुपालवध ३३. **ओं. ४४०.** मग आत्मानंदानें वसति केलेलें, गुरुकृपेचें सुंदर शहर त्याला प्राप्त होतें. वरील त्रिविध दोषांपासून मुक्त झालेला प्राणि, जन्ममृत्यूच्या फेऱ्यांतून सुटतो व गुरुकृपेनें त्याला आत्मानंद चाखावयास मिळतो. तो ब्रह्मनिर्वाणाप्रत जातो. ओं. ४४१. येथें प्रेमाची जी अंतिम सीमा, ती आत्मारूपी माउली त्याला भेटते, व तिच्या आलिंगनांत संसाराची गडबड नाहींशी होते. आत्मस्वरूपीं लीन झाल्यावर संसाराची उठाठेव उरतच नाहीं. **खेवीं**—क्षेमीं—आलिंगनांत. **आटे**—नष्ट होते. **डिंडिमा**—गडबड, घोंटाळा. **ओं.** ४४२. अशाप्रकारें कामक्रोधलोभांना झाडून टाकून जो उभा राहतो, तो एवढ्या मोठ्या लाभाचा स्वामी होतो. **झाडि करुनि**—झाडून टाकून. **गोसावि**—स्वामी.

**( श्लोक तेविसावा )**—'शास्त्रविहित विधि सोडून जो मन मानेल तसें वागतो, त्याला सिद्धि नाहीं, सुखहि नाहीं व उत्तम गतीही मिळत नाहीं.' **ओं.** ४४३. वर सांगितलेलें कांहींच न आवडून जो आत्मवंचक कामादिकांत आपलें डोकें खुपसतो. **दाटणें**—खुपसणें. **ओं.** ४४४.

या ओवींत वेदही अमान्य केला आहे. **ओं. ४४५. वाढवीतु इ०**— इंद्रियांचें कोडकौतुकच जो वाढवीत गेला. **नकरि चि इ०**—ज्याची त्यालाच जेथें चाड नाहीं. **ओं. ४४६.** कामक्रोधांची कास जो सोडीत नाहीं, व ‘ कामक्रोधांना कधींच मी सोडणार नाहीं ’ ही घेतलेली शपथच ज्यानें पाळली आहे. **भास**—शपथ. **स्वैराचाराच्या इ०**—स्वैरवर्तनाच्या मोठ्या रानांत जो शिरला आहे, जो वाटेल तो स्वैराचार करतो. **असोस**–मोठ्या. **ओं.** ४४७. संसार सुटण्याच्या मार्गांत ज्याला प्यावयास पाणी देखील मिळत नाहीं, मग संसारांतून सुटण्याची अथवा मोक्षाची गोष्ट, त्याला स्वप्नांत सुद्धा न दिसण्याइतकी दूरच राहिली. **वाहाणीं**—मार्गांत. पहा—“ तिहीं पुसिली योगाची वाहाणी । ‘ ताता ! हें गुणचीत्ताची वेणी ’ ॥— उद्धवगीत—६७०. **ओं.**–४४८. संसारबंध जाणें या त्याच्या गोष्टीला तरी कोठें पत्ता आहे ! उलट इहलोकींचें विषयोपभोगही त्याला मिळत नाहींत. **ओं.**–४४९. मांसाला लालचावून एकाद्या ब्राह्मणानें मासे धरणाऱ्या कोळ्यांत मिसळावें, व तेथें त्यावेळींच आग लागावी म्हणजे एकीकडे मांसाच्या आशेनें त्याचें ब्राह्मण्य नष्ट व्हावें, व दुसरीकडून त्याला मांसाही न मिळावा, असा दोनीकडून तो जसा मुकतो. **पाणबुडा**—मासे धरणारा कोळी. **ओं**–४५०. त्याप्रमाणें विषयोपभोगाचें कोड पुरवितांना एकीकडे ज्यानें परत्र पालथें केलें आहे, तर दुसरीकडे त्याला मरणानेंच ओढून नेलेलें असतें. **उबडे**—पालथें. **ओं. ४५१.** ‘ इदं च नास्ति परं च न लभ्यते ’ अशी त्याची स्थिति झाल्यावर मग मोक्षाचा सुप्रसंग तरी कोठला ! **ओं. ४५२. ढाळ**—आपल्या चालीप्रमाणें. म्हणून काम विकाराच्या बळावर जो विषयांत रममाण होतो, त्याला विषयही मिळत नाहींत व स्वर्गही मिळत नाहीं, त्याचा उद्धार होत नाहीं.

**( श्लोक चोविसावा )**—“ तस्मात् कर्तव्य कोणतें व अकर्तव्य

कोणतें याचा निर्णय करतांना तुला शास्त्र प्रमाण मानलें पाहिजे, व शास्त्र समजून घेऊन, त्याप्रमाणें या जगांत कर्म करणें तुला उचित होईल." ओं. ४५३. जेया आपुली इ०-ज्याची आपणा स्वतःवर कृपा आहे म्हणजे आत्महिताची ज्याला इच्छा आहे, त्यानें वेदांच्या संदेशाव्यतिरिक्त दुसरें ( आन ) कांहीं करूं नये. ओं. ४५५. गुरुवचना इ०—गुर्वाज्ञेच्या पालनाकडे दृष्टि ( लक्ष ) पुरवीत असतां, शिष्य आत्मभवनांत प्रवेश करतो, आत्मप्राप्ति करून घेतो. पैसे—पैसणें-प्रवेश करणें. ओं.४५६. पुनः आपला ठेवा जर आपल्या हातांत यावा अशी इच्छा असेल तर आपण आपला दिवाच आदरानें पुढें केला पाहिजे. ओं. ४५७. जो इ०— जो सर्व पुरुषार्थांचा आपण स्वामी व्हावें असे म्हणतो किंवा इच्छितो, त्यानें श्रुतिस्मृतींना आपल्या डोक्यावर बसवून घेतल्या पाहिजेत, त्या शिरसावंद्य मानिल्या पाहिजेत. बैसों घापे—बसवून घ्याव्या.

ओं. ४५८. शास्त्र जर सोड म्हणेल तर राज्य देखील तृणाप्रमाणें तुच्छ मानावें. जे घेववि इ०—शास्त्र जें घेववील, घे म्हणेल तें विष असलें तरी विरुद्ध मानूं नये. शास्त्राज्ञा डोळे झांकून पाळावी. वीरु-विरुद्ध. ओं.-४५९.-तरी कें इ०—मग अनिष्टाची गांठ कोठून पडणार ? पडणेंच शक्य नाहीं. ओं. ४६०. अहितापासून निवारण करणारी, हित करून वाढविणारी, श्रुतीहून ( वेदाहून ) दुसरी माउली जगांत नाहीं. यालाच समानार्थक पहा —" पापान्निवारयति योजयते हिताय । किं किं न साधयति कल्पलतेव विद्या ।। " ज्ञानेश्वरांनीं 'शास्त्र' याचा अर्थ, 'वेद' असा करून वेदप्रामाण्याला मान दिला आहे. ओं. ४६१. ब्रह्मेंसीं इ०— ब्रह्माशीं ऐक्य करून देणारी, ब्रह्मनिर्वाण घडविणारी. अगा तुवा इ० अरे ! तुझ्या सारख्यानें तर या वेदाचा विशेषच आदर करावा. ओं.४६२. " कारण हे अर्जुना ! धर्माच्या बळावर तुझा जन्म झाल्यामुळें, शास्त्रें सार्थ झालीं आहेत. धर्मानें वागणाऱ्यास चांगला जन्म मिळतो असें शास्त्रें

म्हणतात. तुला ज्याअर्थी चांगला जन्म मिळाला आहे, त्याअर्थी तूं मागील जन्मीं धर्माचरणानें वागला असला पाहिजेस. म्हणून तूं आपल्या जन्मानें शास्त्राचें वचन खरें केलें आहेस." ओं. ४६३. आणि इ०–आणि धर्मराजाचाही तूं धाकटा भाऊ आहेसच, म्हणजे धर्माचाही तूं भाऊच म्हणावयाचा. ज्ञानेश्वर येथें 'धर्म' या शब्दावर कोटी करण्यास चुकत नाहींत. हे ओघेंचि इ०–ओघानें सहज प्राप्त झालें आहे. अनारिसें–विरुद्ध, भलतें. आपैसे येणें—आपोआप.

ओ. ४६४. पारखी—परीक्षक. वाळावे—टाकावे. कुडे–वाईट ओं. ४६५. कृत्यपणें–करण्यासारखें, करण्यायोग्य असेल तें. सारावें–पुरें करावें. ओं.–४६६ – हे बुद्धिवान् अर्जुना ! आज तुझ्या हातांत विश्व प्रामाण्याचा शिक्का आहे, लोकसंग्रह करण्यास तूं खात्रीनें योग्य आहेस. तूं जें जें करशील तें तें सर्व, जग प्रमाण मानील. तूं जें जें कृत्य करशील त्याला जग 'लोकसंग्रह' असेंच समजेल, हें त्रिवार सत्य आहे. आतां युद्ध केलेस तर तो धर्मच होय, असें जगाला वाटून, तुझ्या वर्तनानें त्यावर लोकसंग्रहाचा शिक्का बसेल. तूं लोकसंग्रहार्थ हें केलेस असेंच सर्व जग मानील. मुद्दी—शिक्का, मुद्रा. त्रिशुद्धि–त्रिवार खरें. निगावा—सुटका, असुरवर्गांतून सुटण्याचा उपाय. ओं. ४६८. भावो जीवाचा—मनांतला भाव. चैतन्याच्या कानीं—प्राणांच्या कानानीं, जीव तोडून ऐका.

ओं. ४६९. ही गीता प्रथम व्यासांच्या आज्ञेनें संजयानें धृतराष्ट्राला सांगितली, व त्याचा वेळ सार्थकी लावला. वेळु फेडिला–वेळ घालविला. तैसा इ०–त्याप्रमाणेंच (ज्ञानदेव म्हणतात), मी निवृत्तिमहाराजांच्या कृपेनें या गीताटीकेनें तुम्हां श्रोत्यांचा वेळ सार्थकीं लावीन. ओं. ४७०. तुम्हीं

श्रोते संत माझ्यावर जर आपल्या कृपादृष्टीचा वर्षाव कराल, तर मीही तुम्ही कराल तेवढा मोठा होईन. बहुडा—वर्षाव. ओं.—४७१. " म्हणून आपलें अवधान देऊन मला प्रसाद द्यावा म्हणजे मी सामर्थ्यवान् होईन," असें ज्ञानदेव म्हणतात. मज ओळगो—आपलें अवधान माझा आश्रय करील असें करा. पसायदान—प्रसाददान. दीजो—द्यावें. क्षमी—सामर्थ्यवान्. तुमच्या कृपादृष्टीचें बल मला पाहिजे असा अर्थ. ज्ञानेश्वरांनीं आपली गुरुभक्ति व विनय आपल्या ग्रंथांत असाच ठिकठिकाणीं व्यक्त करून आपलें कोमल व अभिजात अंतःकरण व्यक्त केलें आहे.



# कठीण शब्दांचा कोश.

## अ

अंगीक—स्वभाव
अड्दरु—भय
अतूट—सलग
अनारिसे—निराळें, विरुद्ध
अनिम—अमर्याद
अपकार—अपराध
अभिचारु—जारणमारण
अर्धधणी—अर्धसंतुष्ट
अवकळा—दुर्दशा
अवगळणें—चुकून राहणें, सुटणें
अवचट—अकस्मात्
अविसाळें—घरटें
अव्हांटा—आडमार्ग
असोसे—पुष्कळ
अहेव—सुवासिनी
अळुमाळ—थोडा

## आ

आइति—डौल
आगळी—अधिक
आंगदट—बळकट
आंगिक—मदत, साह्य
आटणी—क्लेश
आटणें—नाहींसें होणें
आटिव—ओतीव
आटोप—सामर्थ्य, जोर, व्याप
आटोपणे—व्यापणें
आडवंगी—प्रतिबंध, अडथळा
आणी—अंकुर
आतुडणें—सांपडणें
आंतुवट—अंतरंगांतलें
आथिला—संपन्न
आपणपेया—आपणा स्वतःला
आंबुखा—शिंतोडा
आराइणें—अनुकूल असणें
आराणुक—समाधान
आरोगण—भोजन
आर्जव—सरळपणा
आवर्तवणें—पुनः पुनः पढणें
आंविस—भक्ष्य
आसकडी—अडचणीची जागा, उत्कटतेनें
असळग—सोपा
आस्पद—स्थान
आहाणा—घातक

उ

उखर—माळ जमीन

उखा—उषा

उगळणें—बाहेर टाकणें, ओकणें

उगाणा—झाडा

उगाणणें—झाडून सांगणें

उजरा—प्रसिद्धि

उजरी—महत्व

उजळणें—ओवाळणें

उणें—दोष, वाचून, शिवाय

उतणें—बाहेर सांडणें

उदैजत—होत असतानांच

उद्भवणें—वर होणें

उधवी—धुराडें

उन्मेख—ज्ञान, प्रकाश

उपखणें—नाश पावणें

उपचार—आदर

उपलविणें—सविस्तर सांगणें

उपसाहणें—सहन करणें

उपहित—उपाधियुक्त

उभड—लोट

उभारणी—मांडणी

उवाय—आनंद

उवावो—वाव

उसासा—विसावा

उसंतणें—आचरणें

ए

एकवळा—एकोप्पा

एकसरें—एकदम

एटाळे—वेटाळी

ओ

ओरपणें—ओरबडणें

ओलावा—आश्रय

क

कडसणें—विचार करणें

कदरणें—भिणें

कदर्थणें—लाजेनें दु:खी होणें

कराळें—पर्वताच्या कडा

कऱ्हें—उंट

कवतिकिणी—नवल घडवून आणणाऱ्या

कांटाळा—कंटाळा, त्रास

कांटाळें—पारडें

कामारी—चाकर

कामाकार—अंकितपणा

कालकूट—विष

कालाभुला—कासावीस

किडाळ—खोडसाळ

किर—निश्चयानें

कुडें—वाईट

कूटस्थ—शरीरांतील आत्मा

केती—किती

### ख

खतणें—लिप्त होणें
खद्योत—काजवा
खंति—त्रास, कंटाळा
खपुष्प—आकाशपुष्प
खिचटें—खिचडी
खिरडणें—हटणें, माग सरणें
खोचरा—भाला, बरची
खोट—गोळा
खेंव—आलिंगन

### ग

गगनौळ—आकाशपुष्प
गंड—ताठा
गादणें—पीडा पावणें
ग्लानी—दु:ख, काकळूत
गांवरस—गांवांतील घाण पाणी
गोसावी—स्वामी, मालक

### घ

घणावणें—दृढ होणें
घसाखित—कांपणारें

### च

चांगावा—चांगुलपणा
चांथी—बडबड
चांवळणें—बोलून जाणें

### ज

जागोवा—जागरण
जोडी—प्राप्ति
जात्यंध—जन्मांध
जिणणें—जिंकणें
जीव—मन

### झ

झकवणें—फसवणें
झगटणें—लागणें
झनें—कदाचित्

### ट

टवाळें—नकल
टाकणें—पावणें
टाकीं—आटोक्यांत
टिटिभ—टिटवी

### ठ

ठाणांतरी—पहारा करणारा

### ड

डांगोरा—प्रसिद्धि
डिंडिम—घोंटाळा, गडबड

### ढ

ढळणें—झालणें

### त

तव—आवेश
तळवटी—खालीं

तागा—आश्रय
तिखें—पोलाद
तुरंबणें—वास येणें
तूक—वजन
त्रिशुद्धि—त्रिवार खरें

थ

थावणें—वळावणें
थोंब—समुदाय

द

दर्वी—पळी
दांग—अरण्य
दाटणें—अडकविणें
दाटुगी—दांडगी, बलाढ्य
दारवठा—उंबरठा
दिठी—दृष्टि
दीपणें—पेट घेणें
दुणावणें—दुप्पट होणें
दुणा—दुप्पट
देशोदिसें—देशोदिशांना

ध

धड—धडधाकट, दुभती गाय

न

नट—हावभाव
नवल—चमत्कारिक
नवाई—चमत्कार
नाटोपणें— न मिळणें
नाकळण—न आटपणें
नाराच—बाण
नावाणिगी—नामांकित, प्रसिद्ध
नावांनावां—वारंवार
निकी—चांगली
निकृष्ट—फजिती
निखळ—शुद्ध
निगावा—सुटका
निदैव—दुर्दैव
निफजणें—होणें
निबर—कडक, तीव्र
निमाळ—खचरट, अडचणीची
निम्न—सखल जागा
निरय—नरक
निरुत—खरें
निरुंधणें—अडकणें
निवाड--निर्णय
निर्वच—सिद्धांत
निसाण--डंका
निसुग—अमंगळ मनुष्य
निहटणें—जोरानें शिरणें

प

पघळवण—विस्तार करणें
पडिघातणें—ताडण करणें
पढिय—प्रिय

परमारु–परपीडा
परावा–परका
परिभाषा–रीति,प्रचार
पर्यालोच–अवलोकन
पवाडु–विस्तार
पसायदान–प्रसाददान
पळिपणें–पेटणें
पाखाळीं–निर्णयांतीं
पाठीं–नंतर, मागून
पाडु–साहश्य
पाढाऊ–मार्गदर्शक
पाणियड–तळें
पांती–पंक्ति
पारखी–परीक्षक
पाशक–पाश
पाहणें–प्रकाशणें, उजळणें
पुडतपुडती–वारंवार,
पुडुती–नंतर
पुढील–दुसरा
पुरवणी–भर
पेंदळी–वेटाळी
पेणें–मुक्काम, टप्पा
पैलकडु–पलीकडचा
पैसणें–प्रवेश करणें
पैस–प्रसार
प्रस्ताव–प्रसंग

फ

फिटणें–संपणें
फुडे–स्पष्ट
फेडणें–घालविणें
फोकरणें–पुकारा करणें

ब

बहुडा–वर्षाव
बहुवस–पुष्कळ
बासट–पुष्कळ विषें एकत्र करून बनविलेला पदार्थ
बासटणें–विषांत घोळणें
बुझावणें–समजावणें
बैसणा–बसणारा
बोबाइणें–पुकारणें

भ

भलतैसा–कोणताही
भाखड–दूध न देणारी गाय
भाख–शपथ
भोकसा–पेंढा भरलेलें मृत जनावर

म

मवणी–माप, मोजणी
महुर–मधुर
माघौते–मागून, नंतर
माजिरा–मादक
मात–गोष्ट
मांदी–समुदाय

नांदुरी–चाबुकस्वार
मान–योग्यता
माहेवणी–कुलीन स्त्री
मिष–निमित्त
मीनणें–भेटणें
मुद्री–शिक्का, मुद्रा
मृगांभ–मृगजळ
मेर–सीमा, कड,
मैळ–घाणेरडें
मोहरा–पुढें, समोर
मौवाळ–मृदु, प्रेममय

र

रयणी–रात्र
राउळ–देऊळ
रिगणें–जाणें
रुपणें–रुतणें
रूढणें–उत्पन्न होणें
रूपस–रूपवान्
रोम–केश

ल

लाचावणें–सवकणें
लाव–जखीण
लावणी–संबंध
लाहणा–प्राप्त होणारा
लिंपणें–चिकटणें
लंड–धूर्त

व

वडवानळ–समुद्रांतील अग्नि
वरिषा–पावसाळा
वाउर–वाईट
वागुरा–जाळें
वाडपण–थोरपण
वाति–दीपज्योति
वानणें–वर्णन करणें
वानवसें–अकस्मात्
वालभ–प्रियकर
वाहाण–मार्ग
वाळणें–टाकणें
विपायें–कदाचित्
विभांडणें–फोडणें
विभुटणी–वियोग
विवळणें–प्रकाशित होणें
विवंचणें–निवडणें
वीरु–विरुद्ध
वृत्ति–वतन, उपजीविका
वेलरी–वेलीचे फाटे
वेळा–समुद्राची मर्यादा
वोखटें–वाईट
वोडवणें–प्राप्त होणें
वोपणें–देणें
वोलावा–आश्रय
व्याळ–सर्प

**श**

श्लेष–उपमा

**स**

सकणवपणें–सदयपणें
सतिया–पतिव्रता
सदट–बळकट
सफोल–निष्फळ, व्यर्थ
सरोभरी–साम्य, बरोबरी
सवळे–प्रातःकाळीं
सळ–पीडा
सळणें–भयभीत होणें
साइखेडें–खांबसूत्री बाहुली
साउमा–प्रत्यक्ष
सातवेउळी–सात नांग्यांची इंगळी
साच–खरा
सारणें–पुरे करणें
सावावो–मदतनीस
सियारी–भय
सिरियाणी–आवड, इच्छा
सुखाडु–समृद्धि
सुखावणें–सुखी होणें
सुवर्मा–अत्यंत मार्मिक
सुहाडा–बळकट योद्धा
सुहावे–आवडीनें
सूदणें–घालणें
सूणें–घालणें
सूणें–कुत्रें
सेल–उत्तम वांटा
सैंघ–पुष्कळ
सोफ–लटकें, फोल
सोय–अनुकूलता
संकल्प–आशा
संघात–समुदाय
संपजति–जमतात
संभ्रम–आदर
सांकडें–संकट
सांकडणें–संकोच पावणें
सिंथणें–सोडणें, फेंकणें
स्फुरणें–उत्स्फूर्त होणें

**ह**

हळू–हलका
हाथेंवा–काडवातीनें

**क्ष**

क्षमी–सामर्थ्यवान्